


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

भारत सरकारचे १९६५ च
श्रेष्ठता प्रमाणपत्र
मिळविणारे एकमेव
मराठी मासिक

# दीपावली

साहित्य-कला-सङ्गम

सप्टेंबर ६६
वर्ष २२ वे
मूल्य १। रु.



## श्रेयनामावलि–

● न्यायालयासमोर नाटककार......नाटककार, नट, प्रेक्षक नि राज्यकर्ते यांच्या डोळ्यात क्षणक्षणीत अंजन—प्रा. वसंत कानेटकर ● अंदमान ते आनंदमान......लोखंडाला परीस स्पर्शता होते सोने ! — माधव राजवाडे ● झूंड...... माणसातील जनावराची नि संहारक टकरीची बेभान कथा –– बाबुराव बागुल ● एक वात्तड बकरी......दर्दभऱ्या नजरेनं इश्क उघळत नाचणारी ! –– वामन प्रभू ● मी : एक प्रयोगशील साहित्यिक......एका 'प्रयोग'शील लेखकाच्या व्यथेचे व्याकरण ! — दामोदर नाईक ● बाजार......आजच्या समाज–व्यवस्थेचे हृदयद्रावक प्रतिक –– माधव सराफ ● पाश्चात्य स्वैर पट...... (उरले सुरले) वस्त्रहरण करणारा प्रकाशझोत ! –– शांताराम खळे

आणि

**याची देही, याची डोळा....** 'स्वर्गीय' दंभावर प्रहार करणाऱ्या खुसखुशीत कथेचा उत्तरार्ध —अ. अं. कुलकर्णी

☆ राखीव जागेत ☆

असे पाहिले, असे ऐकले ● दीपमाला ● पानपुरी ● सन्मान पुष्पे ● आपलेही (एक) मत ● आणि तुफान विनोदी व्यंगचित्रे...मर्मभेदी !

दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकास रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay -4









अनुक्रमणिका

# दीपावली

## दलाल आर्ट स्टुडिओ


४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART



● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** १६ –००

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत-काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# युगंधराचे पालुपद

'जमेचि ना, बनेचि ना, पटेचि ना, घडेचि ना' अशा शब्दात युगपुरुष वर्षानुवर्षे, युगे युगे गातो आहे.

१९४७ साली आपण ह्या देशाची फाळणी पत्करली व पाकिस्तान ह्या पवित्र नांवाने एक कायमचा शत्रु शेजारी उभा केला. एक अल्पसंख्य जमात 'राष्ट्र' ह्या नांवाने मिरवू लागली. तिला ते सारे मानसन्मान आम्ही दिले. युगंधर म्हणाला, "जगा आणि जगू द्या." आम्हीही त्याना निरोप देताना म्हणालो, "जगा आणि जगू द्या"; पण गेल्या २० वर्षातला पाकचा प्रतिसाद मात्र अवकाशात घुमतो आहे. 'मरा आणि जगू द्या' (आम्हाला) आणि हा प्रतिसाद कृतीत उतरविण्याचेही लहान मोठे प्रयत्नही गेल्या वीस वर्षात अनेक झाले. भारताचा 'नीलकण्ठ' अशी अनेक आक्रमणे पचवूनही ॐकार करीत उभा आहे. पण ह्या 'सनातना'वर आघात करणारी 'असुरी' प्रवृत्ति मात्र सरली नाही. गतवर्षी तिने पुन्हा एकदा अगदी 'ऑपरेशन ग्रँड स्लॅम' ह्या नावाने तिच्या दृष्टीने 'अंतिम' प्रहार केला. ह्याच महिन्यात गेल्या वर्षी ते घडले. आपण जगा आणि जगू द्या' म्हणतच 'काली'चे रुद्र रूप धारण केले. भारतीय निर्धार, तेज व अस्मितेने कुटिल नीतीवर मात केली. आणि जय संपादन केला. युगंधर ढसाढसा रडला. शांतीचे पुण्यनिधान अशा भारताच्याच भूमीवर आपल्या स्वप्नाना अंगार जाळतो आहे हे पाहून तो आक्रोशत म्हणाला, 'जमेचि ना, बनेचि ना, घडेचि ना!'

युगंधराचे पालुपद खरे ठरले आहे. ताश्कंदला महामना लाल बहादुर शास्त्रींचे बलिदान देऊनही ह्या उपखंडातं 'शांती'च्या भावनेचा जय झालाच नाही. पाकचे हृदयपरिवर्तन घडले नाही. युद्धखोराना युद्धच हवे असते. दुसऱ्याच्या विनाशाची स्वप्ने पाहणाराना तीच मोहवितात. गेल्या वर्षी जे घडले त्याचीच पुनरावृत्ति घडण्याची चिन्हे आज सर्वत्र दिसताहेत. गेल्या वर्षीच्या पराभवानंतर पाकने जी तयारी चालविली आहे, तिचे स्वरूप अधिक भयानक आहे. दोन अनिष्ट ग्रह एक झाले आहेत. दोन असुरी शक्तींची युति घडली आहे. काश्मीर, लडाख, नेफा, आसाम, नागा आणि मिझो टेकड्या ह्यातून पुन्हा एकदा युद्धाचे वारे वाहू लागले आहेत. ह्याच महिन्यात 'ते' महाभारत घडले. आणि शकुनी पराभूत (व परागंदा) झाला. आता पुन्हा शकुनी प्रवृत्ति उभ्या ठाकल्या आहेत. त्या आव्हाने देत आहेत. "वैऱ्यांची रात्र आहे. जागा रहा" असे भारताचा राष्ट्रपुरुष अहोरात्र गरजतो आहे. पुन्हा एकदा 'ताश्कंद वृत्ती' पराभूत झाली आहे. युगंधराचा पराभव झाला आहे. त्याची स्वप्ने सरली आहेत आणि म्हणूनच तो गातो आहे, 'जमेचि ना, बनेचि ना, घडेचि ना!'

पण हे असेच घडणार आहे. असेच घडत आले आहे. वैराच्या मातीत प्रीति फुलणार कशी? विनाशाची दारू झोकलेल्याना विवेक सुचणार कसा? मातेची मानतोड करणाराना मातेची मायेची आवाहने ऐकू येणार कशी? 'लढ़के लेंगे हिंदुस्तान' हाच ज्यांचा 'गायत्री' मंत्र आहे त्याना 'जगा आणि जगू द्या' हे युगंधराचे पालुपद सुचणार कसे? शंख, रणशिंगे, ढोल बडविणाऱ्यांच्या कानात प्रेमाची भावगीते शिरणार कशी? पाकची निर्मितीचा मुळी विग्रहाच्या, शत्रुत्वाच्या भावनेवर झाली आहे. ते 'पाक' आहेत आणि आपण 'काफिर' आहोत. काफिरांच्या विनाशातच स्वर्गीय पऱ्यांचा सहवास सुचविणाऱ्या प्रवृत्तीचे व प्रकृतीचे मर्म ओळखणे आणि 'अखंड सावधान' असणे हाच भारताच्या युगपुरुषाचा आजचा धर्म आहे. आम्ही तो आचरूच! तरीही 'ताश्कंद' कराराच्या त्या फडफडणाऱ्या पानापानातून युगंधर मात्र गातच राहिला आहे, जमेचि ना, बनेचि ना, पटेचि ना घडेचि ना!

–सम्पादक






अनुक्रमणिका









**चीन आणि पाकिस्ताननं केलेल्या आक्रमणानी सारा देश खडबडून जागा झाला. खवळून उठला. पण याच आणिबाणीच्या काळात मराठी रंगभूमीवर फुटले ते मादक सौंदर्याचे ॲटमबॉंब ! प्रेक्षकांच्या न्यायालयासमोर उभे झाले सनसनाटी, सस्ते खटले. विकृत, सवंग तमाशे !**



**एका आघाडीच्या नाटककारानेच खुद्द मांडलेला हा ताळेबंद. नाटककार, नट नि प्रेक्षक—सगळ्यांच्याच दृष्टीनं चिंतनीय.**

# न्यायालयासमोर नाटककार

## प्रा. वसंत कानेटकर

**साहित्य** हा जर एका थोर अंत:करणाचा हुंकार असेल, विश्वाची चिंता करणाऱ्या बोलक्या चिंतामणीचा तो एक प्रबल उद्‌गार असेल, तर हा हुंकार आणि उद्‌गार स्वातंत्र्यात फुलावा आणि पारतंत्र्यात गुदमरून जावा यात नवल ते काय? म्हणूनच मानवी जीवनाच्या भाष्यकारानी आणि मानवी आत्म्याच्या शिल्पकारानी इतर कोणाहिपेक्षा स्वातंत्र्यरक्षणाची आंच अधिक बाळगावी. राष्ट्रनौकेच्या डोलकाठीवर बसणाऱ्या मुक्त पक्ष्यांनी दूरच्या वादळाची चाहूल घेऊन खलाशाना त्याची वेळीच इशारत द्यावी, इतकेच नव्हे तर आपत्काल ओढवताच आपल्या लेखणीच्या अंकुशाने समाजमनाच्या गजराजाची विजीगीषु वृत्ति चेतवावी ही अपेक्षाहि साहित्यनिर्मितीच्या प्रक्रियेशी सुसंगतच आहे. पारतंत्र्याचे दु:ख आणि भय एवढे प्रचंड आहे की, त्या धगीने टोलर ,आणि त्स्वाइगसारखी फुले मान टाकून मातीत पडतात तर त्या सर्वनाशी वणव्यातूनच स्वातंत्र्यवीर सावरकरांसारखी अग्निफुले फुलून येतात. अखेर राष्ट्राच्या स्वातंत्र्यरक्षणाचा संघर्ष ही काही केवळ सैनिकांची जिम्मेदारी नव्हे. सैनिक हे समाजपुरुषाचे खड्गहस्त असले तर साहित्यकार हे त्यांच्या हृदयस्थानी आहेत.

काव्येषु नाटकं रम्यं...या सार्थ उक्तिप्रमाणे सर्व ललित साहित्य प्रकारात नाटक हा एक अत्यंत प्रभावी, अवघड पण श्रेष्ठतम कला प्रकार आहे यात शंका नाही. नाटकाच्या माध्यमातून जे प्रक्षोभक संस्कार हजारो प्रेक्षकांच्या अंत:करणावर क्षणार्धात घडवला जातो तेवढा कथा कादंबरी काव्याने शतांशानेहि कोरला जात नाही ही वस्तुस्थिति आहे. मराठी माणसाच्या रक्तातच नाटक भिनले आहे असा दावा वारंवार केला जातो आणि जुन्या आणि नव्या मराठी रंगभूमीचा वैभवकाल डोळ्यासमोर ठेवला तर हा अभिमान गैर आहे असे खचित म्हणता येणार नाही. साहजिकच गेल्या काही वर्षात भारताने ज्या ज्या आक्रमणांशी सर्वशक्तिनिशी मुकाबला केला त्याची प्रत्ययकारी, जिवंत आणि रसरशीत चित्रे मराठी नाटकात उमटलेली असतील असाच कोणीहि तर्क बांधील. पण हा तर्क झाला. वस्तुस्थिती मात्र मराठी नाट्यलेखकानी,





अनुक्रमणिका



**पात्रटिका : बंब**

एक होता बंब
सदा उघडा बंब
बाथरूममध्ये ठेवला त्याला
तो म्हणाली:
'फारच हल्ली पेटतो मेला'

☆ ☆ ☆

**चमचा**

एक होता चमचा
त्याला होती वाईट खोड
सदान् कदा वेळी अवेळी
ह्यात त्यात घाली तोंड

☆ ☆ ☆

**आत्मचरित्र**

एक होती कवयित्री
थोडी धीट थोडी भित्री
तिने आत्मचरित्र लिहिले
नांव : दिवस असे गेले

—ह. शि. खरात

सादरकर्त्यानी आणि प्रेक्षकानी देखील अभिमान बाळगण्यासारखी आहे असे वाटत नाही.

चिनी आणि पाकिस्तानी आक्रमणे गेल्या काही वर्षात भारताच्या सीमेवर धडक देऊन गेली. काही संघर्षातून मानभंग तर काही युद्धप्रसंगातून मानदंड जन्माला आले. सरकार दरबारी आणि-बाणी आणि प्रत्यक्षात कोणत्याहि क्षणि आक्रमणाचे भय शिल्लक राहिले असले, तरी मराठी नाटकात या हर्षखेदाचे प्रतिबिंब तीव्रतेने प्रगट झाले आहे का? मुंबईसारखी महाराष्ट्राची राजधानी हे तर हौशी आणि व्यावसायिक नाट्यप्रपंचाचे केन्द्र. मुंबईत काळोख अवतरला आणि विमानेहि घिरट्या घालून गेली. नाट्य व्यावसायिकांच्या काही सभा झाल्या. प्राप्त परिस्थितीत कोणी किती मानधन घ्यावे याबद्दल काही संकेत ठरवले गेले. लवकरात लवकर काळोख उठवण्याबद्दल सरकार दरबारी शिफारस करणारे काही ठराव पास झाले. संरक्षण निधीत भर घालून करमणुकीच्या मोबदल्यात जाता जाता काही राष्ट्रकार्य केल्याचे समाधान देणारे प्रयोग सादर झाले. पुढे युद्धबंदी झाली. ती होणारच होती. शहरोशहरीचा काळोख उठला. तो उठणारच होता. तहनामेहि झाले. तेहि अटळच होते. पुन्हा नाटके धुमधडाक्याने सुरू झाली. पण राष्ट्र पुरुषाच्या अंगावर जे कोसळले, काही वारसागुणाने, काही स्वसामर्थ्याने तर पुष्कळसे दैवयोगाने जे निभावून नेले, त्याची ठसठशीत तर सोडाच पण अस्फुट चित्रे तरी ते अलिकडच्या मराठी नाटकात उमटली आहेत का ? घडले ते कां घडले आणि घडायचे नसेल तर पुढे काय केले पाहिजे या चिंतेची दखल तरी मराठी रंगभूमीच्या कुटुंबियानी घेतली आहे का? "मराठी" रंगभूमीचे "कुटुंबीय" असा शब्द वापरताना प्रथम मराठी नाटककार, मग सादरकर्त्या संस्था, मग नट आणि मग प्रेक्षक असे चार घटक माझ्या डोळ्यांपुढे उभे आहेत. यापैकी पहिले आणि शेवटचे महत्वाचे. सादरकर्त्या संस्था आणि नट हे तर बोलून चालून "मागणी तसा पुरवठा" या व्यापारी सूत्राचे इमानी पाईक. पण हा सवाल खरोखरी केला पाहिजे "मागणी करणाऱ्या प्रेक्षकाना" आणि ती "मागणी आत्मा विकून पुरवणाऱ्या नाटककाराना." गेल्या चार वर्षातील युद्धजन्य काळात मराठी प्रेक्षकानी पदरमोड करून कोणत्या नाटकांचा गल्ला भरला ते मला माहित आहे आणि सर्वच जाणतात. या कालावधीत किती मादक सौंदर्याचे अॅटम बॉंब मराठी रंगभूमीवर फुटले. गुन्हेगारीचे किती सनसनाटी खटले मराठी नाट्यप्रेमिकानी रोचकतेने बघितले आणि पेशवाईच्या अखेरच्या काळातच शोभतील अशी विकृत तमाशाच्या दर्जाच्या—चुकलो अव्वल मराठेशाहीत तमाशानी देखील फार मोठी कामगिरी बजावली होती. त्यावेळचे लावण्या ऐकणारे शूर वीर "शूर मर्दाचा पवाडा शूर मर्द" होऊन ऐकत होते. ते पवाडे संपले आणि शूर मर्दाचे रंजन करणारे तमाशेहि मावळले. आता उरली आहेत फक्त चवली पावलीची सिनेमातली भ्रष्ट गाणी. तर असल्या विकृत तमाशाच्या दर्जाची सवंग नाटके रंगभूमीवर प्रेक्षकानी स्वहस्ते किती रुजवली—या सगळ्या घटनांचा तपशीलवार ताळेबंद देण्याची गरज नाही. दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभी चर्चिलने भयग्रस्त फ्रान्सच्या पंतप्रधानाला सल्ला दिला होता की, तुमच्या राष्ट्रातले संगीत, नृत्यप्रकार आणि नाटके याना वळण लावा. मग युद्धाची भीति तुम्हाला वाटणार नाही. चर्चिलचा सल्ला जुमानला गेला नाही म्हणूनच गेल्या महायुद्धात फ्रान्स लाचारपणे परतंत्र झाला आणि फ्रान्सने स्वातंत्र्य पाहिले तेहि लाचारीने दोस्तांच्या मनगटवळावरच.

चर्चिल हा नुसता कधी काळचा सैनिक वा संकटग्रस्त राष्ट्राचा केवळ महामंत्री नव्हता. तो शेक्सपीयरप्रेमी होता. शेक्सपीयरच्या नाटकाचा त्याचा अभ्यास एवढा दांडगा की प्रयोगासाठी चर्चिल हजर असला तर काम करणाऱ्या नटानीहि त्याची धास्ती घ्यावी. शेक्सपीयरचे एखादे स्वगत नट म्हणू लागला की प्रेक्षागारात बसलेले चर्चिल महाशयहि ते स्वगत पुटपुटू लागत आणि चूकभूल घडली तर तेथल्या तेथेच त्याची रोख पावती देत. या नाट्यवेडातूनच चर्चिल शब्दप्रभू झाला. आणि असे म्हणतात की गेले महायुद्ध चर्चिलने जिंकले ते केवळ शब्दप्रभुत्वावर. त्या तुलनेने मराठी सोडाच पण भारतीय नाटककारांच्या नाट्यकृतीनी पुढाऱ्याना आणि सामान्य रसिक जनाना कोणती प्रेरणा दिलेली








आहे? गुदमरलेल्या पारतंत्र्यात वा स्वातंत्र्य युद्धात नाटककार समाजाला कोणती प्रेरणा देऊ शकतात, याचे कॅरेल कॅपेकचे "मदर" वाउगो बेट्टीचे, "क्वीन अँड द रिबेल्स" ही नाटकेहि उत्तम दर्शन घडवतात. पण गोव्याच्या मुक्ति संग्रामात भाग घेणाऱ्या सौ. सुधाताई जोशींच्यासारख्या एका सामान्य असामान्य गृहिणीवरहि नाटक लिहिण्याची प्रेरणा मराठी नाटककाराना कां होऊ नये? गोव्याचा शेवटचा गव्हर्नर जनरल अँन्तोनियो दि सिल्व्हा—ज्याने अखेरच्या क्षणी गोव्याचा सर्वनाश करण्याचे नाकारले, पराभव पत्करला आणि पोर्तुगालसारख्या स्वदेशात विनाशाला जो सामोरा गेला, त्यावर मराठी नाटककारानी मौन कां बाळगावे? गेल्या चिनी आक्रमणाच्या माघारीनंतर माओत्से-तुंग म्हणाला "भारताची चिंता मला वाटत नाही. भारताला मी एक दिवसात शरण यायला लावीन. माओसारखा नेता ही दर्पोक्ति केवळ लष्करी बळावर करू शकत नाही. लष्करामागे बळ उभे असते लोकांचे. खचित मला असे वाटते की, "शिवरायाचे शूर मराठी सैनिक आता मावळले आहेत आणि त्याचे वारसदार रंगभूमीवर फुटणाऱ्या मादक सौंदर्याच्या अॅटमबाँम्बचे प्रयोग पहाण्यात मश्गूल आहेत," ही वार्ता माओच्या गुप्तहेरानी त्याला दिली असावी. एरवी अटकेवर झेंडे फडकविणाऱ्या राघोभरारीचा दरारा माओला वाटला नसता काय?

पण या वस्तुस्थितीबद्दल निव्वळ प्रेक्षकानाहि दोष देणे योग्य होणार नाही. अखेर प्रेक्षक हे लहान मुलासारखे किंवा लष्करातल्या शूर जवानासारखे असतात. लष्करी तज्ज्ञ सेनापती नेहमी म्हणतात की, "जवान हा नेहमीच चांगला असतो. चांगले किंवा वाईट असतात ते त्यांचे सेनापती." हा नियम मला वाटते प्रेक्षकानाहि लागू आहे. प्रेक्षक चांगलेच असतात. त्याना बरे वाईट घडवतात ते नाटककार. म्हणून या व्यवहारातील अखेरची सर्व जिम्मेदारी आहे एकट्या नाटककाराची—ज्या प्रेक्षकानी शेकडो सवंग नाटकांचा गल्ला भरला त्यानीच कोणा एका कानेटकराचे "रायगडाला जेव्हा जाग येते" हे अनेक दृष्टीने सदोष पण कोणत्याहि अर्थाने सवंग नसलेले नाटक मराठी रंगभूमीवर जिवंत ठेवलेच ना? म्हणून राष्ट्र संकटात असताना तुम्ही कोणते नाटक लिहित होता हा सवाल विचारला पाहिजे. "रायगड" लिहिणाऱ्या कानेटकराना, "विषकन्या" लिहिणाऱ्या पु. भा. भाव्याना, "मी जिंकलो मी हरलो" लिहिणाऱ्या तेंडुलकराना, "पहाटेची, चाहूल" लिहिणाऱ्या शं. गो. साठयांना, "गारंबीचा बापू" लिहिणाऱ्या श्री. ना. पेंडशांना. "कौंतेय" लिहिणाऱ्या नव्हे—"बर्फाचे तट पेटुनी उठले" हे प्रक्षोभक संग्रामगीत लिहिणाऱ्या शिरवाडकरांना, "पंडितराज जगन्नाथ" लिहिणाऱ्या विद्याधर गोखल्यांना, तुमचा आणि माझा आवडता नाटककार पु. ल. देशपांडयांना आणि अखेर तपोधन नाटककार आचार्य अत्र्यांना. दोन नांवे मी मुद्दाम वगळली आहेत—बाळ कोल्हटकर आणि ग. दि. माडगुळकर.

याच कालखंडात कोल्हटकरानी "सीमेवरून परत जा" आणि माडगुळकरानी "परचक्र" ही नाटके लिहून मऱ्हाठीयाचे इमान राखण्याचा शर्थीने प्रयत्न केला. पण ही नाटके रंगभूमीवर तग धरू शकली नाहीत. कामगार जगतात देखील शेकडो नाटके या विषयावर लिहिली गेली, सादर केली गेली आणि त्यांचे कार्य आटोपताच मावळली गेली. गुणवत्तेचा विचार सोडूनहि लेखकानी "वैऱ्याची रात्र" ओळखली आणि आपला आवाज उठवला याबद्दल त्याना धन्यवाद दिले पाहिजेत.

पण बाकीचे प्रमुख नाटककार या प्रश्नाबद्दल उदासीन कां राहिले, कसे राहिले? या प्रश्नाचे उत्तर मिळालेच पाहिजे. शक्य तर निरनिराळ्या साहित्यिक संस्थानी या प्रमुख नाटककारांवर "अभिरूप खटला" भरला पाहिजे. त्यांना जाब विचारला पाहिजे. आणि त्याना बोलायला लावले पाहिजे. अशा अभिरूप खटल्यातून या नाटककारांच्या श्रद्धा अश्रद्धा काय आहेत याचा तरी निदान एकदा निकाल लागेल. "शिवसंभव" लिहिणारे कै. वासुदेव शास्त्री खरे,

( पान ६० पहा )








[पर्व ६ वे]

—माधव राजवाडे

# अंदमान ते आनंदमान

अंदमान हे फिजी होऊ शकेल ? पर्यटकांचा स्वर्ग होऊ शकेल ? तसे ते होण्यासारखे होतेच. पण त्याच जोडीने अंदमानची सर्वांगीण उन्नति व विकासास समांतर अशी पर्यटक म्हणून केंद्राची उभारणी करणे आवश्यक होते. अंदमान हे जगातील उत्कृष्ट विश्रांतिस्थान व्हावे या स्वप्नात आम्ही सुरवातीपासूनच चूर होतो.

**रचना**

**पौषाचा** शेवट आणि माघाचे आगमन असा मोसम असावा. हा बहुतेक उनी कपडे वापरण्याचा मोसम असतो. परन्तु अंदमान येथे थंडी नाहीच. पण हवा त्यातल्या त्यात छान असायची. उकाडा आणि दमटपणा ओसरलेला असतो. झुळझुळणारे वारे देहातील उत्साहाला ललकारणारे आणि मनाला तोषवणारे असतात. वास्तविक इतरत्र (म्हणजे जिथे सागरी वायुमान नाही तिथे) हे दिवस बोचऱ्या थंडीला मागे सारणारे आणि गुलाबी थंडीचा शिरकावा करणारे. तसेच दिवस आता मोठा होत जाणार याची चाहूल सांगणारे. अंदमान येथे मात्र दिवसाचा पसारा आणि रात्रीचा व्याप यात तसा विशेष फरक पडत नसे. हवामानाचा प्रसन्नपणा सतत असायचा—

मी आमच्या राहत्या निवासस्थानी बसून भोवताली पाहत होतो. जमिनीचा एकहि पट्टा असा नव्हता की, जो निसर्गाच्या



पशूचे सौजन्य, माणसांचे औचित्य

अनुग्रहाने नटला व थाटला नव्हता. भूमीचे नखहि दिसू नये असा झाकला गेला होता. हिरवटपणाने धुंद आणि नाना रंगानी मस्त झाला होता. कणाकणातून आणि पानापानातून पृथ्वी कृतार्थ आणि सौंदर्य यथार्थ झाल्याचा गुंजारव ऐकू येत होता. हा गुंजारव जाणीवेस खिजवता खिजवता स्मृतीने आदिवासींची एक कथा समूर्त केली: पृथ्वीवर आकाश व सूर्य यांची प्रीति. पण पृथ्वीचे प्रेम आकाशावर. झाले काय की, पृथ्वीचे झाले लग्न सूर्याबरोबर. आकाशाचे प्रेमभंगाचे अश्रू म्हणजे पाऊस. पृथ्वी-सूर्य संयोग सांजसकाळी. सांजची कातरवेळ आणि पहाटेचे पानावरचे दहिवर. व्यथेची तळमळ आणि तळमळीची व्यथा असे तर हे निसर्गाचे रुपक. निसर्गपूत्र आदिवासीच अशी आर्द्र कल्पना करू जाणे . . .

**वाढ आणि विकास**

'शोभा चांगलीच सुधारली की, अगदी ओळखू येत नाही...' कुणीतरी म्हणत होते. मायभूमीहून पाहुणे आले होते. शोभाला ते अडीच वर्षानी पाहत होते. शोभाची तब्येत चांगली झाली हे आम्हाला दिसत होते. कळत होते. पण तिच्यात झालेला फरक किती आहे याची रोज पाहणाऱ्याला कल्पना येत नव्हती. त्याला अशी पाहुण्यांची दृष्टी लागते. मला लगेच जाणवलं ते असं की, आम्ही अंदमान येथे कामास व योजनेस सुरवात केली. योजनेतून काम आणि कामातून योजना अशी आमची आगेकूच चालली होती. उरलेली कामे संपत होती. नवी कामे हातात घेतली जात होती. ती लवकर पूर्ण करता यावीत अशी कोशीस चालू होती. अडखळत नव्हतो असे नव्हे. पण त्याने कामाची फेरतपासणी, पुन्हा आखणी आणि सुधारणेची खणी असा क्रम लावत होतो. प्रगति होत होती, दिसत होती. पण किती मजल मारली ? किती पुढे गेलो ? काय फरक झाला...

**पशूचे सौजन्य, माणसांचे औचित्य**

—अंदमान येथे माणसे व माणसांची प्रकृति, माती व मातीचा







गुण आणि दिसलेले व दडलेले बल आणि क्षमता पाहिली. उक्ती-कृतीची साखळी निर्माण केली. आमच्याकडे साऱ्यांचे लक्ष होते. सगळे पाहत होते तरी होता होईल तो स्वत: प्रेक्षणीय व्हायच्या ऐवजी करत असलेले कार्य संस्मरणीय व्हावे अशी तोशीस होती. कुठपर्यंत आलो ? वाढणारी शोभा सतत समोरच होती पण ती किती वाढली हे पाहुण्यांच्या लक्षात प्रथमदर्शनी आले. अंदमान पाहण्याकरिता एक अधिकृत पाहुणी आली. म्हणजे त्यावेळच्या गृहखात्याच्या उपमंत्री श्रीमति व्हायोलेट आल्वा आल्या. आस्थेनं त्यानी अंदमानच्या बेटावर पाऊल ठेवलं. गजराजाने हार घातला. माणसानी टाळ्या पिटल्या. पशूने सौजन्य दाखवले. माणसानी औचित्य दाखवले. अगदी थोड्या अवधीत केलेल्या (म्हणजे ६ महिन्यात) वाटचालीचा बाईनी गौरव केला. प्रकृतीने प्रफुल्लीत असलेल्या बेटाना मानवी प्रयत्नानी जो साज चढवण्याचा उद्योग आरंभ केला होता त्याने बाई एवढ्या खूश झाल्या की, त्यानी बेटाबद्दल हर्षोद्‌गार काढले 'A Gem hanging in the Pendant of the Indian Peninsula that is India' कर्मचारीवृंद आनंदित आणि उत्तेजित झाला. त्यांचा उत्साह शतगुणित झाला आणि शेफारून न जाता आणखीन् जोमाने कामे केली. ती पुढे नेली. इ. स. १९६० च्या सुरवातीस नुकतेच दिवंगत झालेले भारताचे पहिले रँग्लर सर रघुनाथ परांजपे येऊन गेले. त्यांच्याबरोबर जस्टीज शंकर बालाजी ढवळे आले. बुद्धिवादाची अविरत जपणूक करणारे आणि विनातडजोड वर्तणूक ठेवणारे अशी रँग्लर परांजपे यांची ख्याती. मनाला जाणवले ते बुद्धीला पटल्याशिवाय कबूल करणारे आणि बोलणारे ते नव्हते, असा त्यांचा खाक्या होता. तशी त्यांची जीवनी होती. त्यातून ते जेव्हा अंदमान येथे आले तेव्हा कोणाच्याहि पदाच्या, पथकाच्या आणि अधिकाराच्या निमित्ताने किंवा अनुषंगाने आले नव्हते. या संदर्भात आपले मत व्यक्त करण्यात त्यानी बंधने पाळावीत असेहि कुणाला अपेक्षिता आले नसते. शिवाय आम्हाला असे आढळून आले होते की, जो कुणी अंदमान येथे यावयाचा तो पूर्वग्रह घेऊन यायचा. त्यात त्याचा दोष नसायचा. अंदमानचा इतिहास त्याला कारण होता. अशा स्थितीत रँग्लर परांजपे हेहि त्याच मानसिक अवस्थेत अले नसते तरच नवल. आणि परांजपे तशा पार्श्वभूमीवर आले होते हे त्यांच्याच प्रकटीकरणावरून नंतर स्पष्ट झाले. परांजपे यानी अंदमान पाहिले. आम्ही ते त्याना जसे पाहावयाचे होते तसे पाहू दिले. मोकळेपणाने ते जसे अंदमान पाहत गेले तसा वाढत गेला. त्यानी जे अंदमान पाहिले त्यामुळे ते एवढे भारले की, त्यानी त्या 'पाहण्याला' आपल्या आत्मचरित्रात 'दर्शन' म्हटले आहे. आपल्या आत्मचरित्रात (नाबाद ८९– पान १४९) ते लिहितात: 'अंदमान हे नाव नुसते उच्चारले तरी डोळ्यापुढे एक भयानक चित्र उभे राहते. प्रत्यक्षात या बेटांचे दर्शन घडले की मात्र आधीचे चित्र पार पुसले जाते.' रँग्लरांच्या या भावनेचा परमोत्कर्ष त्यांच्या पुस्तकातील या एकोणीसाव्या प्रकरणाचा शेवट करताना जो



**नामदार गोखल्यांचे जामात आणि लेखकाचे श्वशुर न्या. ढवळे आणि महाराष्ट्राचे पहिले रँग्लर**

झाला आहे तो निम्नलिखित शब्दात आविष्कृत झाला आहे, 'मी माझ्या उभ्या आयुष्यात या बेटातल्यापेक्षा अधिक आल्हाददायक सुटी घालविली नाही असेच मी म्हणेन' (नावाद ८९– पान १५०). एवढेच नव्हे तर रँग्लर जेव्हा अंदमान येथील सफरीनंतर मायभूमीला परतले तेव्हा त्यानी अंदमानवर लिहिलेल्या एका खास लेखात म्हटले की, अंदमान येथे मजेत घालविलेल्या पाच आठवड्यांकडे ते सदा 'मागे परतोनि' पाहत राहतील ! परांजपे यानी अंदमान येथे होत असलेले विकासक्षम आणि सुधारणावेधी बदल पाहून समाधान व्यक्त केले हे निराळे सांगणे नलगे. रँग्लरांचे ते शब्द – त्यातील दिलासा आणि कौतुक शब्दात मापता–जोखता येणे अशक्य आहे. अंदमान शासनावर त्याचा परिणाम एवढाच झाला की, हुरुप वाढला. मागे न पाहता, अल्पसंतुष्ट न होता, मुळीच न थबकता पुढे चाललो. . . .

मला सरकारी नोकरीत अंगिकृत कामे करताना नेहमी एका बोलपटाची आठवण होते. शहनाई नवाज बिस्मिल्लाह खान यांचे सनईवादन त्या बोलपटात होते. सनई रंगात येत असतानाच ती थांबली. सनईचा बोलपट नव्हता. बोलपटात सनई होती. बोलपट पुढे चालूच होता. तसेच सरकारी नोकरीचे. पद कायम चालूच राहते. चालवणारा मध्येच बदलतो. तेव्हा पाहिले की, आपल्या कारकिर्दीत काय काय झाले हे सनई दुसऱ्याच्या हातात द्यावयाचे अगोदरच एकदा पाहावे. . .

काय ठरवले ? काय झाले ?

## पुनर्वसनातील सात्मीकरण

–पुनर्वस्तीकरता जी जमीन प्राप्त केली होती ती विनाविलंब पूर्व बंगालच्या निर्वासिताना वसवण्याकरता वापरात आणली. ही वापरात आणताना जवळीक निर्माण करण्याकरता जागांची नावे आणि भूषणे सजवली. परन्तु त्यापूर्वी जियून जियून माणसे आली त्या त्या ठिकाणची माणसांची आसक्ति विचारात घेऊन नावे योजिली. अंदमान येथेहि फोरशोर रोड, मरीन ड्राईव्ह, कालिकत, कदंबतोला, कालिघाट, बकुलतोला, इ. इ. नावानी रहिवाश्यांच्या मनातल्या परस्थपणाच्या भावनेची उग्रता नाहीशी केली. वसवलेल्या बंगाली कुटुंबांची संख्या जवळ जवळ चार हजाराच्या घरात गेली. मुख्यत्वे निर्वासितांच्या समस्येचे निवारण प्रधान होते. भारताच्या दाटीच्या वस्तीला उतार पडावा म्हणून इतर प्रांतातील लोकहि वसवले. इ. स. १९५९ साली जो आढावा घेतला त्याला अनुसरून–

| | | |
|---|---|---|
| पश्चिम | बंगाली कुटुम्बे | २३६३ |
| केरळीय | " | १२५ |
| बिहारी | " | १०५ |
| तामीळ | " | ३५ |



लोकवस्ती वसवण्याच्या दृष्टीने उपलब्ध जागेचा विचार करून बंगाली माणसांच्या करता मध्य व उत्तर अंदमानात सोय केली. दक्षिण अंदमानात ज्या भारतीयांना सिलोन, इ. इ. ठिकाणीहून परतावे लागले त्यांची व्यवस्था केली. मोठ्या निकोबारात २०,००० एकर जमीन व छोट्या निकोबारात ५००० एकर जमीन शोधून काढली व ती या संबंधात सुयोग्य व सुलभ होती. हीच जमीन सिंव्हलद्वीपातून परतणाऱ्या तामिळी लोकांच्या पुनर्वसतीकरता, त्यावेळचे मद्रासचे मुख्यमंत्री श्री. कामराज नादर यांच्याकडे सुपूर्द करण्यासाठी भेट घेतली होती. ह्याच संदर्भात त्यानी श्री. राजाराम यांचे नेतृत्वाखालील एक शिष्टमंडळ मार्च १९६० मध्ये पाठवले होते.

## जीवन वाहिनी

अंदमान बेटांच्या देहाला एकता आणण्याकरता रस्त्यांची जुळणी अत्यावश्यक होती. अंदमान बेटांचा लांबूळका आणि मधून मधून तुटलेला आकार आणि नकाशा पाहिल्यास हे लक्षात येते की, एकीकडे बेटांच्या आत आणि बेटाना एकमेकाना जोडणारा रस्ता जमीन आणि पाण्याच्या पार्श्वभागाच्या अनुसंधानात आयोजिल्याशिवाय दळण-वळणाचे सौकर्य शक्य नाही. बेटांचे उत्तर, मध्य आणि दक्षिण विभाग आहेत. कोणतेही बेट सपाटीचे आणि सलग नाही. शिवाय भोवताली सागरी विळखा आहे. म्हणजे बेटांच्या आत या टोकापासून त्या टोकापर्यंत वाहतुकीला रस्ता, मग त्या रस्त्याशी जोडणारा सोयीस्कर असा बोटींचा धक्का (जेटी) आणि ह्या धक्क्याला दुसऱ्या किनाऱ्याचा पुन्हा तसाच धक्का व या दुसऱ्या धक्क्यापासून बेटांच्या आत जाणारा जमिनीवरचा चांगला रस्ता आखणे व तयार करणे – अशी रस्ते बांधणीच्या कामाची साखळी निर्माण केल्याशिवाय उपयुक्त ठरणारा व्यवहार्य पर्याय नव्हता. याकरता अस्तित्वात असलेले रस्ते शक्य तितके विस्तारणे, नीट करणे आणि आवश्यक तेवढे वाढवणे, त्यांचे सांधे ठरवणे आणि पाण्याच्या आवक-जावकीशी सुसूत्र करणे, ही कामे तडीस नेली. धक्के (जेटीज) बांधण्यास आरंभ केला. काही थोड्या फेरी बोटस् तयार करवल्या आणि बेटांच्या आंतरवाहतूकीच्या फेरी बोटी बनविण्याची माझगाव डॉककडे ऑर्डर नोंदवली. बंदरांचा संपर्क वरचेवर होण्यास अनुकूल असा मोठा रस्ता तयार करण्याचा आराखडा तयार झाला. याचाच परिणाम म्हणून ग्रेट अंदमान ट्रंक रोड अस्तित्वात आला. यामुळे उत्तर, मध्य आणि दक्षिण अंदमानच्या तीन टप्प्यावर राजरस्त्याचे समवस्थापन साधले आणि दुसरीकडे फेरी बोटस् मुळे सागरी वाहतूक सहजगत झाली. पर्यटकांच्या दृष्टीने अंदमानचे अनेकांगी, अनेकरंगी एका सफरीतले 'एक दर्शन' सहजशक्य व सुखावह होण्याची पूर्वतयारी झाली.

[ क्रमशः ]



—बाबुराव बागुल

**ते दाही दिशाना व्यापणार मृत्यूचे तोंड....त्या तोंडातील पर्वतप्राय दात, दाढ, जाळाच्या जिभेसारखी लळलळणारी लाल जीभ....नष्ट होण्यासाठी गावमहारवाड्यातली माणसे झुंडीने त्यात शिरत होती....बुवांनी श्रद्धाळू हात जोडले, हुंदका यावा तस शब्द बाहेर पडले....श्रीरंगा, तुझ्या या विराट रूपाहून अर्जुनाचा संदेह आम्हासाठी बरा होता रे....**



'अेय् ऽऽ जागी व्हय म्हंतोयना मी कव्हाचा. का देऊ बरगडचात बुक्का ठऊन. . . ' हा वासनेने उद्धट झालेला आवाज तिचे कानावर आला तसा तिच्या काळजाने ठाव सोडला. तोंडातील मऊ लुसलुशीत घास तोंडातच राहिला. कोवळ्या गव्हाच्या चवदार अन्नाने अंगभर पसरलेला आनंद उडून गेला. सुखाने हळू हळू हालणारा शेपटीचा झोला भयाने गप्पकन् थांबला. अंगावर थरारून कांटा फुटला. तो सरसरत तोंडाकडे गेला. कान टवकारले गेले. भितीने भरलेले हिरवेगार डोळे आवाजाच्या रोखाने धावत गेले. अंधारात उभे असलेले ते काळडोक्यांचे घर पाहून जीव घेऊन ओघळीकडे पळून जावेसे वाटले. पण अन्नाच्या मोहाने पाऊल निघेना. अन् काळडोक्याच्या जीवघेऊ माराच्या धास्तीने तिला तिथे थांबवेना. तिच्या मनातील ही बेचैनी तिने ओघळीकडे तोंड करून झूंडीला दाखविली. तशी तिच्या मागची अवघी झूंड थरारून गेली. काही भिऱ्या जनावरानी दबक्या चालीने ओघळीकडे जोडीजोडीने अंगाला अंग घाशीत चालायला सुरुवातही केली. सर्व सावध झाली. अन् तिच्या इशाऱ्याची वाट पाहू लागली.

'ए तुज्या आयचं झोपाळू. उठ म्हंतोयना मी कव्हाचा. सरळ सोयची व्हय म्हंतोयना. कोणच्याय भी गोठीचा तुला येवढा कटाळा कसा ? मी येवढ्या जोखमीनं मळ्यात ठेऊन घेतली त्याचं या खताला काई मोलच नही. . . ए गधडा उठतीस का देऊ ढुंगणावर दणके ठेऊन. . . . '

सवंध दिवसाच्या ढोर मेहनतीमुळे व त्याच्या दोनवेळच्या मनछंदेपणामुळे ती शिणून गाढ झोपी गेली. त्यामुळे त्याची बडबड तिच्या कानावर येत नव्हती. आणि त्याला तर येवढीही कळ निघत नव्हती. त्याची आवड तिला माहीत असूनही ती निसुर झोपल्याचं पाहून त्याला तिची खूप चीड आली होती. सकाळी शेतात घुसलेली किसन महाराची गाय जशी चाबकाने झोडपून वेडी केली होती तशी तिला झोडपून काढावी, तिची झोप उडवून द्यावी, त्याच्या आवडीची अशी आठवण करून द्यावी, असे त्याच्या मनात आले. तसा तो रागाने



अनुक्रमणिका

तिच्याकडे पाहू लागला. जाडजुड गोधडीखाली दडलेला तिचा तरुणपणाने तुडुंब भरलेला देह पाहून त्याचा भडका उडाला आणि तो कडा कोसळल्याप्रमाणे तिला झोडपू लागला. दगड–धोंड्याप्रमाणे पडणारा त्याचा मार असह्य होऊन ती जोर जोराने ओरडू लागली.

'आरडू नको. नरड्यात लाकुड खुपसून ठार करीन. कव्हाचा उठवंतोय. काल दहा महारानं मला मारला म्हणून तुला माझं म्याव वाटनासं झालं ? गप्प. नहीतर उरात लाथ घालून छातीचा चुराडा करीन.'

तो लाथ उभारून उभा राहीला. त्याचा कसलेला कठीण उंचच् देह पाहून ती एकदम रडायची थांबली. मनात आल्याप्रमाणे तो करतो हे तिला माहीत झाले होते. गाव-महारवाड्याची हुज्जत सुरू झाल्यापासून त्याने महारवाड्यातील कितीतरी माणसे झोडपून काढली होती. मुकी जनावरेही त्याच्या रागातून सुटली नव्हती. हुंदके देत अंगावरली गोधडी दूर करून ती सरळ सोयची झाली.

आणि त्या दोघांची रड ओरड ऐकून झुंड जीव घेऊन पळू लागली. भराभर उतरण उतरून ओघळीतील चिखल पाणी तुडवित रेल्वेपलीकडील डोंगराकडे पळू लागली. ओघळीची उंच उतरण गर्दीने उतरत असताना एकदोन गाभण गाई कोलमडून पडल्या तशी सुसाट गती गोंधळून गेली. त्यामुळे चिडाचिडी सुरू झाली. माणसाच्या मारातून वाचण्यासाठी एकमेकाला हुंदाडीत ती पळ काढू लागली. या पळापळीत सर्वात जास्त म्यालेले आणि आईपासून एकटे पडलेले वासरू वाट मिळविण्यासाठी भीतीने ओरडले. त्याचे ओरडणे ऐकून माणसांची धास्ती घेतलेल्या एका वातळ बैलाने भीतीने बिथरून त्याला धडक देऊन खाली आदळले. अनेकांच्या धक्यानी जायबंदी झालेले वासरू पळण्यासाठी धडपडत उठू लागले. पण त्याला उठता येत नव्हते. त्यामुळे ते अधिक ओरडू लागले. त्याची ओरड ऐकून माणसाला धाकावलेली ती झुंड जोरजोराने धाऊ लागली. तशी त्याची ओरड अधिकच होऊ लागली.

'च्यायभनं वासरू असं एकाएकी का आरडू लागलय ? किसन्याची गाय दुपारी धोपाटली म्हणून त्यानं हातरोगानं समदा गोठा निजवून त् ठिवला नही ?' जबरीने सुख घेऊन उताण्या पडलेल्या नामाच्या मनात आले. तसे तो बायकोला म्हणाला–

'ये येड्या गधडी, किसन्या गोंडा देईल काय वासरू असं एकाएकी वरडतय्.'

त्याला उत्तर म्हणून तिने अंगावर गोधडी घेऊन त्याचेकडे पाठ केली. तिचा राग पाहून तो गोधडीत शिरून तिला गोंजारू लागला. तिचा राग घालवू लागला. त्याच्या त्या गोंजरण्याने ती झोपी गेली. त्याच्याही डोळ्यावर झापड येऊ लागली. असा काही वेळ गेला नाही तोच इंजिनाच्या लागोपाठ उसळणाऱ्या शिट्ट्याने तो धडपडून उठून बसला.

'ए. . . . ' तो तिला काही सांगणार तोच त्याच्या कानावर डब्ब्यावर डब्बे आदळल्याचा, काही स्त्री-पुरुष ओरडल्याचे आवाज आले. तसा तो तडकन उठून बाहेर येऊन पाहू लागला. बघता बघता त्याच्या अंगावर भीतीने काटा फुटला. बावरून गेला. डोळे चोळ-चोळून पुनः पुन्हा पाहू लागला. त्याला बघावी तिकडे सर्व जमीन धुऊन पुसून लख्ख केल्यासारखी दिसत होती. त्याचा त्याच्या डोळ्यावर विश्वासच बसेना. तो धावत जाऊन लगलगा जमीन चाचपडीत पळू लागला. पण त्याच्या हाताला कुठेच गव्हाचा कोंभ लागत नव्हता. शेणाने, मातीने त्याचे हात भरू लागले. तसे त्याचे ऊर फाटू लागले. झांज आल्यासारखे त्याला वाटू लागले. तो मटकन् खाली बसला आणि त्याच्या बायकोने फोडला तसाच हंबरडा त्याच्या उरात वळू लागला.

'अरे वाहया, किसन्या तू असा सूड घेतला !' किसनचे नाव लक्षात येताच त्याच्या उरातील हंबरडा जळून गेला. आणि तो भडक्यासारखा भपकन् उभारून आला. गावाकडे, महारवाड्याकडे दात ओठ खात पाहू लागला. गावाजवळची एकनाथ बुवाची शेती, त्याच्या जवळची तुका माळ्याची बागायत आणि त्या पलिकडची महारांची हिरवीगार हाडकी हाडोळी पाहून तर त्याच्या रागाला सीमाच राहिली नाही. किसननेच हे भयंकर अक्रित केल्याची त्याची खात्री झाली. तशी किसनचा खून पाडण्याची अन् महारवाडा जाळून खाक करण्याची त्याने आरोळी ठोकली– 'किसन्या, भाड्या आज तू जगत नाहीस. . . म्हारवाडा जाळून खाक केला नाही तर बापाचं नांव सांगणार नाही. . . . '

आणि असा डरकाळत तो गावाचे दिशेने धावू लागला. धावता धावता किसनने केलेल्या अनेक सुधारणा, चळवळी त्याला गुन्ह्या-प्रमाणे वाटू लागल्या. गेल्या महिन्यापासून गाव-महारवाड्यातून विस्तव जात नव्हता. दोन्ही बाजूनी एकमेकावर काठ्या निघत होत्या. दगडफेकी अधून मधून झडत होत्या. रात्रीचा हल्ला होईल म्हणून दोन्ही बाजूने हत्यारबंद पहारे ठेवले होते. गाव-महारवाड्याला दोन विरोधी छावण्याचे रुप आले होते. अन् या सर्वाला कारण किसनला धरले जात होते. गेल्या कैक वर्षांपासून गाव त्याच्या जीवावर उदार झाले होते. त्याचे खून करण्याचे बेत रचले जात होते. पण तो मारला जात नव्हता. उलट गावाला भारी भरत होता. विहीरीच्या पाण्यावरून त्याने गावातील मोठमोठ्या पुढा-ऱ्याना बेड्या भरल्या होत्या. त्यात नामाचा वडील भाऊही होता. गावातल्या मंदिरात येऊन गावाच्या नाकावर टिच्चून त्यानं महा-रांच्या सभा घेतल्या होत्या. आणि आता तर त्याने धर्मदीक्षा घेतली होती. अन् जुन्या देवधर्माची टवाळी चालवली होती. त्याची ती भाषणे आठवून नामाच्या अंगातून भडके उठू लागले. त्याचा कधी जीव घेईन असे त्याला वाटू लागले. तसतसा तो रागाने, सुडाने बेभान होऊन पळू लागला. मांड्यापोटावर वाऱ्याचे फटके बसू लागले तसे त्याने खाली पाहिले. कंबरेला न आवळलेल्या लंगोटी-शिवाय काहीच नसल्याचे, हातात भाला नसल्याचे जाणवताच तो त्यापेक्षा दुप्पट वेगाने माघारी फिरला. अंथरुणाजवळ गेला. उशाला घेतलेले धोतर, खमीस खसकन् ओढून त्याने ते कसंतरी अंगात घातले. धोतर कंबरेला गुंडाळले. डोक्यावर टोपी दाबून दिली. अन् भाला घेऊन त्याने बाहेर झेप घेतली. त्याच वेळी वासराची






कमालीची करुण किंकाळी त्याला कव घालू लागली. तो गावाकडे पळत सुटण्याऐवजी थांबला. तसा त्याच्या सुडाने भडकलेल्या डोक्यात भडका उडाला—

'भडव्यानं सर्वी गुन्हं भी निजवून त ठेवली नहीत ?'

'ठेवील. हायेच तसा'– असे मनात येताच त्याने एका घावेत गोठा गाठला. लगबगीने थेट दावणीजवळ जाऊन प्रत्येक जनावराला उठवू लागला. शेपटचा वर करून हातानी शेपटचाखालची जागा व नाक, तोंडे तपासू लागला. असा तो तपाशीत असतानाच वासराने पुन्हा हंबरडा फोडला. तसा तो भरकन् बाहेर आला. भिरीरी इकडे तिकडे पाहू लागला. आणि अनेक जणांची दूरवर पसरलेली उघडी बोडकी काळीकर्द जमीन पाहून त्याच्या काळजाचा जाळ झाला— 'भडव्यानं गुरं घातली व्हती. त्याच्यातलच वासरु वरडतय. मी पिकात घुसलेली त्याची गाय मारली म्हणून त्यानं महारवाड्यातली गुरं घालून नासाडी केली... अरे राक्षसा, तू असा सूड घेतलास. पण मी भी नाम्या हाये. मला आग्या येताळ म्हण्‌यात. मी भी गुरं घालतो. अख्या महारवाड्याचं वाळवांट करतो. कर माझं काय वाकडं करायचं ते.'

आणि येवढाहि विचार न करता तो गोठ्यात शिरला. भराभर दावी सोडू लागला. दणादण दणके देऊन गुऱ्हाना बाहेर पिटाळू लागला. मार खाऊनही उभ्या असलेल्या जनावरांच्या शेपटचा मोडीत शिव्या देत लोटू लागला. त्याच्या मारपिटीने भांबावलेली जनावरे बाहेर पडली. व गावाच्या दिशेने बांधाबांधाने पळू लागली. महारांच्या हाडकी हाडोळ्यात घालण्यासाठी तो हाका दे देऊन त्यांना मागे वळवू लागला. पण त्याचे न ऐकता, थांबता ती एकामागे एक पळत होती. त्यांचे ते बांधाबांधाने शहाण्यासारखं पळणं पाहून तो संतापून गेला. आणि त्यांच्यापुढे जीव तोडून पळत जाऊन तो त्यांच्या तोंडावर, शिंगावर सपासप सपके मारून त्याना मागे वळवू लागला. महारांच्या शेतीत घालवू लागला! पण गुरे पिकामध्ये शिरत नव्हती. म्हणून त्याने हाणाहाणीची, शिव्याशापाची वारधुळ उठवून दिली होती.



त्याच्या या तुफान ओरड्यान यमुनीला जाग आली. शेजारी तो नसल्याचे पाहून ती मनाशी म्हणाली:

आता हा राक्षीस जित्रावं जगू देत नाही....उठलं पायजे. त्याला आडवलं पायजे.....त्याच्या मारपिटीतून जनावरं वाचविण्यासाठी ती उठली. झोपेने जड झालेल्या हाताने ती उश्याशी घेतलेले चोळी लुगडे शोधू लागली. बरांच वेळ झाला तरी चोळी सापडेना आणि बाहेर उठलेला त्याचा धुमाकूळ थांबेना. तेव्हा तिने चोळी शोधण्याचे सोडून कसे तरी लुगडे कंबरेला गुंडाळले व ती बाहेर येऊन उभी राहून पाहू लागली.

तो त्याच्या तावडीत सापडलेल्या एका गाईला बडवीत होता. ती बिचारी जीव वाचविण्यासाठी इकडे तिकडे तोंड फिरवित पळत होती. मार चुकवू पहात होती. पण पिकात मात्र शिरत नव्हती. तसतशी त्याला तिची चीड येत होती.

'शीर ! म्हाराच्या पिकात शीर. शिरतीस का देऊ दणके....' तो पळून गेलेल्या सर्व गुरांचा राग तिच्यावर काढीत होता. त्याचा तो संताप पाहून तिला वाटलं आता गाय जगत नाही. महापाप लागल्याशिवाय रहात नाही. तेव्हा त्याने मारले तरी चालेल— त्याला रोखले पाहिजे. म्हणून ती काळीज मोठे करीत म्हणाली.... 'आओ, ती मरंल. पाप लागंल.'

बायकोची ओरड ऐकताच त्याने हात आवरता घेतला. तसा गाईने जीव घेऊन पळ काढला. आणि तो हातातील भाला घेऊन बायकोच्या अंगावर धावला— 'निलाजरे गधडी मला शिकवतीस काय ? जशी अंथरूणात पडली व्हतीस तशीच उठून का आली नहीस? कशाला आड लावलस.....' तिच्या एकमेकाला खेटलेल्या उघड्या उरावर भाला रोखून तो ओरडला.

त्याचा तो उग्र अवतार पाहून ती भितीने लटलटा कापू लागली. रडू लागली.

'अिवळू नको. आधी उरावर पदर घे. अशी बकरीसारखी छाती मोकळी टाकायला लाज वाटत नाही हिदगे !' त्याने काडकन् तिच्या कानाखाली आवाज काढला. तशी आलेली झांज दूर करीत ती लुगड्यात गुंडाळला गेलेला पदर बरोबर करू लागली.

'रडू नको. खाली बघ. नही तर..........'

ती तिच्या मांडा पोटऱ्या पाहू लागली. तिचे इकडे तिकडे वळून पहाणे, कंबर चाचपणे, तमाशातील नखरेल नाचीचे हावभाव वाटले. त्यामळे त्याला ती चावट वाटली. त्यामुळे त्याला तिची चीड आली. अन् त्याने तिच्या गालावर बोटे उठवून विचारणा केली, 'नखरा दाखऊ नको. गहू दाखव.'

'गहू?'

'कुठय्??' एकमेकाला खेटलेल्या तिच्या उरावर दणका देऊन त्याने डरकाळी फोडली.

'म्हारानी गुऱ्हाना चारला असंल,' आलेला हुंदका कसातरी रोखीत ती म्हणाली.







अनुक्रमणिका

'किसन्या!' किसनला आई बहिणीवर शिव्या देत त्याने हाडकी हाडोळ्याकडे धाव ठोकली. महारवाड्यातील कर्त्या माणसांची नावे घेऊन तो मोठमोठ्याने शिव्या देत मारामारीला बोलावित पिकातून इकडे तिकडे धावत होता. पायाने गहू रगडीत होता. पायाखाली न रगडल्या गेलेल्या एखाद्या अंकुरावर भाला मारीत होता. त्याचा तो पिसाटपणा पाहून तिला वाटले झालेल्या नुकसानीला आपल्यालाच जबाबदार धरून मारमारून. जीव घेईल. तो वेडा झालाय. इथून पळालो तरच जीव वाचेल म्हणून ती जीव वाचविण्यासाठी गावाचे दिशेने पळू लागली. आणि त्याने मागून येऊन भाला पाठीत खुपसू नये म्हणून ती ओरडू लागली – 'भाऊजी पळाओ, म्हारानी गहू चोरला ओ.....'

तिची अक्रास्ताळी ओरड ऐकून त्याला अधीक चेव येऊन तो या मेरा पासून त्या मेरा पर्यंत भाले मारीत जमीन उकरीत उमाळून पडलेल्या अंकुराला तुडवित धावू लागला. असा तो धावत असताना भाला भसकन् त्याच्या पायात शिरला. तशी त्याने जोराने आरोळी ठोकली.. 'यमुने, गधडी पळ लवकर..पळ..'

त्याची ओरड ऐकून तिला त्याची अधिक भीति वाटली. ती मागे येण्याऐवजी अधिक जोराने पुढे पळत ओरडू लागली–

'भाऊजी, पळा! म्हारानी त्यान्चा खून केला.'

'ये तुज्या आयला , माजा खून करील असा कोंचा अीर त्या शेळीच्या शेपटात हाये....इकड ये'....आणि तो खाली कोसळून पडला.

काळीज कापविणारी तिची ओरड ऐकून गावमहारवाड्यातील पहाऱ्यावर असलेले तरुण दोन्ही वाटेने तिला वाचविण्यासाठी शिवाराकडे धावू लागले. महारवाड्याकडून येणारी हत्यारबंद टोळी पाहून ती भयभीत होऊन ओरडू लागली– 'भाऊजी धावा, मला वाचवा. 'म्हारं आली'...

तिच्या ओरडीतून आग उसळत होती. त्या आगीने गावातील माणसे मंत्रमोहीत झाल्यासारखी बेभान होऊन भराभर गावाबाहेर पडत होती. आणि तिच्याजवळ थांबलेली महारवाड्यातील माणसे तिच्यावर भडकून गेली होती. किसनला माघारी फिरावेसे वाटत होते. वाईट शिव्या देऊन तिला रक्ताळे करावेसे बारक्याला वाटत होते. आणि तारुण्याने ताठरलेले तिचे उभार उर पाहून स्त्रीआसक्त शिव्याला तिला मिठ्ठी मारून कुस्करावेसे वाटत होते.

'धरा, साली, खोटं आरोप करती, धरा...' शिवा तिच्या उरावर नजर रोखीत पुढे झाला. तसा किसन पुढे होऊन म्हणाला – 'शिवा, मागं फिर. काठीला काठ्या–कुऱ्हाडीनं जबाब मिळतो...'

'मिळू द्या...पण हिची रग जिरवू द्या...'

"पण... शिवा आला. किसन्या पुढं झाला... वाचवा!" किसनचे नाव ऐकताच गाव महारवाड्यात खळबळ झाली. माणसे बेभान झाली. नामा तर किसनचे नाव ऐकताच संतापून उठला. त्याने पायात घुसलेला भाला भसकन् उपसून काढला. अन् विजेच्या लोळाप्रमाणे कडाडत तो तिच्यासमोर मागे पुढे करीत असलेल्या शिवा किसनवर येऊन आदळला– 'किसन्या घे. आता तुमच्या

बायका पोरी कश्या वाचतात ते बघ'. . . त्याने किसनवर भाला फेकला. तसा किसन खाली कोसळला. गरकन् पुढे होऊन तो शिवावर धावला– 'शिव्या भडव्या मर. . . आता तुझ्या वहिणीचे हाल बघ... दोन बायकांची लुगडी बघ . . .'

तो शिवावर वार घेऊन धावला. शिवाने वार चुकवून हातातील काठी फिरवीत त्याच्यावर हल्ला केला तसे बाकीचे लोकही धावले. नि त्यानी त्याला काही क्षणातच मरणाच्या हाती देऊन किसनला पाठीवर घेऊन महारवाड्याकडे धाव घेतली...तशी ती नवरा मेल्याच्या समजुतीने आक्रोश करीत ओरडू लागली–

'त्याना ठार करून म्हारं पळून गेले. पळा, धरा. बदला घ्या !'

तिच्या लागोपाठ उसळणाऱ्या आरोळ्याने गावातील गल्या-गल्यातून इतराना लोक उठवित होते. जे दार उघडून बाहेर येत नव्हते, त्यांची वाटेल तशी निर्भत्सना करीत होते.

'ये. . . आमच्या भी बायका तरण्या देखण्या हायेत. तिकडं माणसं मरल्यात...बायकांच्या इज्जती लुटल्या जातात अन् तू तिच्या-पुढं कानात बोळ घालून पडला हायेस. ओठ ! उंद्या तिची भी आब्रु न्हाणार नाही !'

'ये, येश्या, रावज्या, भायेर या. . . इस वरसं झाली तरी हौस फिटली नही. नाम्याला ठार मारलं. अन् यमनीवर दहानं जबरी केली... उठा भडव्यानो. . .'

भडकलेले लोक घराघरातून माणूस उठवित होते. लोक हातात मिळेल ते घेऊन बाहेर पडत होते. फक्त गावातील एकुलते एक ब्राह्मण एकनाथ बुवा ज्ञानेश्वरी वाचण्यात तन्मय झाले होते. गावात उठलेली वैराची आग त्याना दिसत नव्हती. ऐकू येत नव्हती. दारा-पुढे माणसे ओरडत आहेत, हाका मारीत आहेत, हे त्याच्या कानावर पडत नव्हते.

'ए बुवा !' कोणी तरी चिडून ओरडले.

'...इये मुखे जहाली प्रविष्टे, परी एकही तोंडौनी न सुटे, असे कर्म देखा. . .'

'जाळा त्या पोथीला जाळा. . . इथं गावात मुडदे पडल्यात अन् तुम्ही पोथी वाचता ?'

'काय झालं देवान् ?'

'नामाला ठार केला. यमनीवर इस जनानी जबरी केली. मेली. . .'

'गावावर दहा गावचे महार जमून हल्ला केला. . . अन् तुम्ही पुराणात वांगी बघता. . . .

'उठा. . . काठी घ्या !'

'ऐका. . . दगडफेक, रडारड ऐका. . .' गावाच्या बाहेर महार-वाड्याला वेढा देऊन सूड उगविण्यासाठी धावणारे लोक महार वाड्यातील दगडफेकीने किंचाळत होते. एकमेकाला हाका देत होते, पुढे सरायला सांगत होते. कुत्र्यांच्या आणि माणसांच्या आरडा ओरडीने गाव डोक्यावर घेतले होते.

'ऐकले ?'

'होय. . . पण. . .'

'चला रे. बामनाची जात लय निसाचा–किस करणारी. त्याच्या सरसवतीवर जबरी व्हइल तवा त्याला कळ लागंल. . .' बुवाचा शांतपणा पाहून, त्याचे तन्मय होऊन पोथी वाचणे पाहून लोक संतापले होते. त्याना बघताच बुवाही शिवीगाळ करीत बाहेर पडले असते तर त्यानी आनंदित होऊन बुवांचा जयजयकार केला असता. पण बुवा शांतच होते. म्हणून ते बुवांची निर्भत्सना करीत पुढे झाले. आणि कष्टी झालेले बुवा घरातील मंडळी नको म्हणत असताही हातात नेहमी असणारी काठी घेऊन घरावाहेर पडले.

'दिसंल त्याला ठार करा. . .'

'दिसंल तिला धरा. . . पोर असो, म्हातारी असो !

"घरं जाळा !"

'किसन्याची खांडोळी करा !'

गावाबाहेर आलेल्या बुवाच्या कानावर, तापलेल्या तेलाप्रमाणे हे सुडाने सडलेले शब्द पडत होते. ते ऐकून ते उभे कापत होते. मागे फिरावेसे वाटत होते. पण गावाला घाबरून मागे फिरताही येत नव्हते. आणि लोक तर भडकत चालले होते. मारा आणि मरा ही भावना युद्धासारखी सर्वठायी झाली होती. त्यामुळे आरडा ओरडीला, शिवीगाळीला, दगडफेकीला तुफान भरती आली होती. वैर वाढत होते. ते पाहून त्याना वाटले – जोराने ओरडावे– थांबा ! लढायी बंद करा...तुम्ही एका आईची लेकरं आहात ! पण त्याना–ते ब्राह्मण आहेत–जुन्या वळणाचे आहेत म्हणून–गाव महारवाड्यामध्ये किंमत नव्हती. उलट त्यांच्या श्रद्धेची टवाळीच केली जात होती. हे अप-मानाचे दुःख आठवताच त्यांच्या मनात उसळून आलेली ही आपुलकी विरून गेली. आणि तुकारामाच्या अभंगातील ती ओळ खिळचा-सारखी त्यांच्या मनात खपकन् खुपली "तुका म्हणे उगे रहा, जे जे होईल ते ते पहा. . ." आणि ते उगेपणाने पहात चालले. रस्त्यावर रक्तबंबाळ होऊन काही माणसे पडली होती. त्यांचे कण्हणे ऐकून तिथे थांबावे असे त्याना वाटले. पण त्यांनी शिवी देऊन हाकलून दिले तर. . .बुवा तसेच पुढे झाले. तोच त्यांच्या पाठीवर बदाबद दो। दगड येऊन पडले. 'आईऽग. . .' म्हणून ते मटकन् खाली बसले. आणि त्याच वेळी यमुनीचा आक्रोश आला – 'मेले ! मेले !'...

'अरे यमुनी . . .!' बुवा तसेच उठले. अन् आवाजाच्या रोखाने धावत सुटले.

यमुनी नामाच्या अंगावर पडून रडत होती. तिला बघताच बुवा तिचे जवळ गेले आणि म्हणाले – 'काय झालं बाळ ?'

'दगड आले. यांच्या छातीत एक लागला. हे ओरडले.'

'त्याची नाडी बघू दे.'

नाडी बघितल्यावर ते तिला म्हणाले– 'लेकरा, घाबरू नको. रक्त जाऊ देऊ नको. पट्ट्या मार.'

बुवाचे ऐकताच डोईवरला पदर काढून ती भराभर पट्ट्या फाडू लागली. जखमा बांधू लागली. अंगात चोळी नसल्याची तिला जाणीव नव्हती. तिचा रसरशीत तरुण उघडा देह बघताच बुवांनी डोळे मिटून तोंड हाताने झाकून घेतले.

अनुक्रमणिका







'तुम्हाला भी लागलंय् ?'
'होय मुली.'
'झालं?' लुगडे फाडण्याचा आवाज बंद पडल्यावर त्यानी विचारले.
'जी. झालं.'

'बेटा, तुझी चोळी काय झाली ?' तिचेवर जबरी झाली नसावी असे त्याना तिला बघताच वाटले होते. पण तिला उघडी बघताच झाली असावी असे त्याना वाटले म्हणून त्यानी तिला विचारले.

'चोळी ?' अंगात चोळी नसल्याची तिला जाणीवही नव्हती. बुवा बोलल्यावर तिने खाली नजर केली. आपले उघडे शरीर पाहून ती लगबगीने अपुऱ्या पदराने झाकू लागली. पण पदर पुरत नव्हता. म्हणून तिने बुवांकडे नजर टाकली. बुवानी तोंड का झाकून घेतले हे कळून येताच तिला रडू कोसळले.

'रडू नको.'
'चोळी काय झाली ?'
'अंथरुणात राहिली.'

'देवांची किरपा. किसन असं करणार नही– असं मला वाटत व्हतं. हुशार, अभ्यासू माणूस आहे तो. आंबेडकर ज बोलले ते त्यानी केले. महार पार बदलून टाकले.'

बुवांचे बोलणे ऐकून ती पुनः रडू लागली.

'रडू नको. मी आत्ता चोळी घेऊन येतो. तू अशी उघडी गेली तर तुला घरात घेणार नाहीत. आणि एक महारीण शुद्ध रहाणार नाही. जातो.' आणि बुवा तिच्या मळचाकडे निघाले. अंधारात दिसेनासे झाले. महारवाड्यावर पिछाडीकडून हमला करावयास गेलेले लोक धबधबा पुढे पळत होते आणि त्यांच्या मागे भरारा दगड येऊन पाठीत-डोकीत आदळत होते. पळणाऱ्यात सर्वात पुढे गणपत पहिलवान होता. दुरूनच सोन्यासारखी लखलखणारी यमुनीची उघडी पाठ बघताच तो तिच्याकडे धावत गेला. गपकन खाली वाकून त्याने तिचे दोन्ही दंड धरून तिला उभी केली. आणि जोराने छातीशी कवटाळून तो तिला पुढे घेऊन मोठ्याने बोलू लागला– 'पळा, वैनी पळा. . . '

त्याचे उरावर घट्ट दाबलेले पंजे दूर करीत तिने किंकाळी फोडली, "सोड मेल्या, सोड. तुजा मुडदा म्हसनात जाओ. काई वळख धर..'

'काय झालं. . . .' गणपतच्या बायकोशी लगट करण्याच्या खूब्या माहीत असलेला रावजी म्हणाला.

'काय व्हणार ! याना उठावलं तर या लागल्या बोंबलायला. मरू द्या. . . येऊद्या म्हारड्याना.'

'चल'. ते दोघे येणारे दगड चुकवित पळू लागले. तसा तिने टाहो फोडला.....

'गणपत भाऊजी, मला स्यामी करा. मला आणि याना घेऊन चला. वाचवा...' सर्व गावाशी वाकडा असलेला नामा मेला तरी लोकाना विशेष वाईट वाटणार नाही. अन् चोळीची वाट पहात इथे बसले तर जीव आणि शील रहाणार नाही या भितीने तिने सर्व विसरून विनंति केली. तसे ते दोघे परत आले.

'चला'....तिच्या अपुऱ्या पदरामुळे उठून दिसणाऱ्या उरावर नजर लावीत गणपत निर्भयपणाने म्हणाला. त्याचे पाहणे पाहून तिला चीड आली होती. तरी ती म्हणाली – 'त्यानाही घ्या. . . . '

'घेतो.' त्याने त्याला उचलून पाठीवर टाकले. अन् ते तिघे चालू लागले. दगड पडत होते. माणसे ओरडत होती. तुफान हाणाहाणी चालली होती तरी तिच्या उघड्या शरीराने बेभान झालेला गणपत तिला कशी पुनः कवटाळावी याचाच विचार करीत होता. त्याला वाटत होते, आमच्यावर जोरदार हल्ला व्हावा. त्यात रावजी घायाळ होऊन पडावा. मग तिला घेऊन आंधारात झुडपाआड लपता येईल अन् तिथेच जबरीने तिच्याकडून सुख घेता येईल....

पण त्याला संधी मिळत नव्हती. वेळ जात होती. ते महारवाड्या-जवळ आले होते. तिचे दूरून चमकणारे उघडे दंड पाहून पहाणारांची तिच्यावर बलात्कार झाल्याची खात्री होत होती. तसतशी वैराची आग भडकत होती. महारवाड्यातील दोन एक घरानी पेट घेतला होता. तो जाळ पाहून गाव आगीच्या उल्हासाने उसळत होता. अधिक प्रखर हल्ला महारवाड्यावर करीत होता. महारवाडा निर्बल होऊ लागला होता. पुरुषाना दगड गोळा करून देणाऱ्या, आगी विझविणाऱ्या बायका मोकळ्या झालेल्या पिछाडीने शिवाराकडे पळत निघाल्या होत्या.

आणि शिवारामधील सत्यस्थिति पाहून बुवा आले होते व दूर उभे राहून पहात होते. गांवातून झुंडीच्या झुंडी गर्जना करत महारवाड्यावर आदळत होत्या. तीन घराना आगी लागल्या होत्या. हाणामारीचा, आगओरडीचा गदारोळ उठला होता. तो पाहून बुवा हादरून गेले होते. त्याना वाटत होते, जोराने ओरडून सांगावे–देवानू, महारांचा काही दोष नाही. रानभरी जनावरांच्या झुंडीने गहू खाल्ला. ती जनावरे गाडीखाली सापडून मेली. म्हणून इतर जना-वरानी इंजनाशी झूंज देऊन गाडी बंद पाडली. अन् जनावराने केलेली नुकसानी हिरव्या डोक्याच्या नाम्याने महाराच्या माथी मारली.. . .

पण बुवांच्या तोंडातून शब्द फुटत नव्हते. बोलले असते तरी त्यांचे कोणी ऐकले नसते. उलट दोनचार धोपाट्या देऊन त्याना मातीत लोळावले असते. ते मुकेच होते. मघाप्रमाणे ते गंभीर होऊ लागले. मघाचेच शब्द त्यांच्या मनात उठू लागले–तुका म्हणे उगे रहा, जे जे होईल ते ते पहा. . . ते पहात होते. समोर चाललेली मृत्यूची लीला पाहून त्याना वाटू लागले, हे असेच होणार. . . .

आणि बघता बघता बुवा एकदम तटस्थ झाले. त्याना ज्ञानेश्वरी-तील ती ओवी आठवू लागली – 'तैसी सांचली सैन्य ऐकवाते, इथे मुखे जहाली प्रविष्टे, परी एकही तोंडौनी न सुटे, ऐसे कर्म देखा...'

बुवांना ते दाही दिशा व्यापणारे मृत्यूचे विक्राळ तोंड दिसत होते. त्या तोंडातील पर्वतप्राय दांत, दाढ, जाळाच्या जिभेसारखी लळ-लळणारी लाल जीभ दिसत होती. आणि नष्ट होण्यासाठी गावमहारवाड्यातील माणसे झुंडीने त्यात शिरत असल्याचे, नष्ट होत असल्याचे त्याना दिसू लागले. तसे ते थरथरू लागले. त्यांचे श्रद्धाळू हात जोडले गेले. हुंदका यावा तसे त्यांच्या तोंडातून शब्द थरथरत बाहेर पडू लागले– 'श्रीरंगा, तुझ्या या विराट रूपाहून अर्जुनाचा संदेह आम्हासाठी बरा होता रे !

आणि महारवाड्यातील चौथेही घर धडधडा जळू लागले होते. आणि बुवांच्या ओळखीचे गर्दीत कोणी तरी ओरडत होते... 'अरे बायका कुठंयत्. . .?'

गणप्या वाटतं हा. त्याचाच आवाज आहे ! ●●●







अनुक्रमणिका



# एक प्रयोगशील साहित्यिक



—दामोदर नाईक

साहित्याचा इतराना उपयोग होतो. (असं म्हणतात) पण साहित्याचा साहित्यिकालाच (असा) उपयोग होऊ शकतो हे ह्या 'प्रयोग'शील लेखावरून कळावे.



**या** जगामध्ये प्रयत्नवादाची काहीच कदर केली जाऊ नये ना? निष्काम कर्मयोगाला काहीच प्रतिष्ठा असू नये ना? माणसाच्या धडपडीचं, कर्तृत्वाचं काहीच कोडकौतुक केलं जाऊ नये ना? प्रतिष्ठितांच्या मातब्बरीपुढं अप्रतिष्ठांच्या कर्तबगारीचं, जगाच्या परंपराप्रिय प्रवृत्तीपुढं नवीनांच्या नाविन्याचं, गटबाजीच्या एकजुटीपुढं विस्कळीत पण आशादायी नवीन प्रयत्नांचं काहीच चालू नये ना? कौतुकाचा, उत्तेजनाचा एवढा तुटवडा रसिकांमध्ये भासावा ना?

हे मी कुठल्यातरी शोकान्तिकेवरचं एखाद्या शिष्ट टीकाकाराचं विद्व जड भाष्य सांगत नाही. हे स्वतःविषयी बोलतो आहे मी! यात उद्वेग असला, निराशावादी सूर असला तर तो माझा दोष नाही. परिस्थितीचा दोष आहे. माझ्या सखोल, तिरकस-आडव्या-उभ्या आशययुक्त साहित्याचा, नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेचा आणि तिच्या भिन्नभिन्न आविष्कारांचा युगप्रवर्तक, क्रांतिकारक, आशादायी, प्रगतिशील अशा मानाच्या शब्दानी उदोउदो कां केला जात नाही, हा साऱ्या शिष्ट टीकाकाराना माझा सवाल आहे. माझं प्रयोगशील लिखाण 'साभार परत' या मानभावी अहेरानिशी परत माझ्याकडे पाठविण्याचा उदारपणा तरी तुम्ही का दाखविता, हा माझा साऱ्या संपादकबुद्रुकाना सवाल आहे! माझ्या युगप्रवर्तक, प्रयोगशील अतएव सर्वश्रेष्ठ (माझ्या मते) कवितांच केराच्या टोपलीशी नातं जुळविण्याचा तुम्हाला कोणता नैतिक अधिकार पोचतो हा माझा सवाल आहे!

या माझ्या सवालाना "पसंत नाही", "पत्रव्यवहार केला जाणार नाही" इत्यादि ठराविक जबाब देण्याखेरीज (तोसुद्धा दोनतीन स्मरणपत्रं पाठविल्यावर) गत्यंतर नाही याची मला खात्री आहे. आणि मग मला त्यांची कीव येते. त्यांच्या चिटचा, मानसिक पातळीबद्दल कणव वाटते आणि भवभूतीप्रमाणे "आज नाही उद्या, उद्या नाही परवा, एक महिन्याने, एक वर्षाने, पांच वर्षानी (पांच दहा हजार वर्षं वाट पहायला मी कुठे राहणार?) तुम्हाला ते साहित्य परत वाचावंच लागेल, प्रसंगी छापावंच लागेल. नाहीतर तुम्ही त्याला अंतराल हो" असा इशारा द्यावासा वाटतो.

—कारण मराठीत सांप्रत उदंड ऐशी मासिकं निघताहेत. चालताहेत. (असे वाटते). बंद पडताहेत. पुन्हा दुसरी नवीन सुरू होताहेत. मराठी माणूस बुद्धिमान आहे, बुद्धिजीवी आहे आणि साहित्याबद्दल त्याला अमाप आस्था आहे—उत्साह आहे. (एक रुपयात तीस तीस मासिके वाचणे त्याशिवाय का शक्य आहे?) शिवाय वेळ घालविण्याचं (ना खंत ना खेद) एक प्रमुख साधन म्हणून तो साहित्याकडे आशेनं, प्रेमानं पाहतो. या भिन्नभिन्न प्रवृत्तींच्या वाचकांची भूक भागविण्यासाठी निरनिराळ्या प्रकारची मासिकं चालताहेत. ती चालण्यासाठी साहित्यिक मालाची






जोरात मागणी आहे. (beg, buy, borrow or steal) प्रथित-यशाना वेळ नाही. तूर्त कांही सुचत नाही. (असं ते म्हणतात) प्रतिभा ओसरलेली आहे त्यांची. दिवाळी अंक साठी त्याना बेगमी करायची आहे. (नाहीतर) दिवाळी अंक साफ आपटतील ही (त्यांचीच) भीति. शिवाय त्यांचं मानधन नवीन मासिकांच्या आवाक्याबाहेरचं आहे. त्यामुळे गुणवत्ता असलेल्या नवीन साहित्या-कडे संपादक अगत्याने पाहताहेत. (साहित्याचं 'मोल' करता येत नाही या श्रद्धेने) या नवीन मासिकांमध्ये शृंगारिक, विनोदी मासिकांची आज चलती आहे. त्यातला कोणीतरी आमचा समानधर्मा संपादक आम्हाला भेटेलच—कारण काल अमर्याद आहे व पृथ्वी विशाल आहे. असा रसिक व गुणी मिळाला नाही तर मात्र इशारा द्यावासा वाटतो की, ते साहित्य महाराष्ट्र शारदेला कायमचं अंतरल्याशिवाय राहणार नाही.

याला एक अपरिहार्य अशी कौटुंबिक कारणपरंपरा आहे. मुलांच्या प्रातर्विधीसाठी, शेगडी पेटविण्यासाठी, पुढ्चा बांधण्या-साठी आणि "वगैरे वगैरे"साठी आमच्या सौभाग्यवतीला कागद वरचेवर लागतात. वर्तमानपत्राचे रद्दी म्हणून पैसे येतात, या सबबीखाली ती वर्तमानपत्राना हातहि न लावता (काय 'रद्दी' काढतात हो म्हणते) माझ्या टेबलावर, टेबलाच्या खणांवर हल्ला चढविते आणि मला 'कामाचे आहेत का?' असा प्रश्नहि न करता ते कामाचे नाहीतच, असा सोईस्कर (गैर) समज करून घेऊन सहजासहजी बोलता बोलता उचलण्याची लकब तिला चांगली साधली आहे. माझ्या सर्व प्रयोगातला एक निरुपद्रवी व हक्काचा कायम भागीदार म्हणून तिचा हाहि अपराध मी (खरं म्हणजे वेदना) क्षमाशील वृत्तीनें गिळतो.

आर्यपत्नी असल्यामुळे व वाङमयात काही कळत नसल्यामुळे (हे अप्पलं सोयीचं बोलणं) ती पलंगावर पडल्यापडल्या माझं साहित्य ऐकून घेते. अधुनमधून तोंडावर हात धरून हळूच जांभया देते आणि ऐकता ऐकता (नकळत–तिची कैफियत) झोपते. पण मी मात्र माझ्या साहित्यसृष्टीत उंच उंच, अनाकलनीय झेपा घेत (म्हणजे भरकटत–इति सौ.) इतका उच्च पातळीवर गेलेला असतो. सौ. झोपली आहे, हेहि बऱ्याच वेळा माझ्या लक्षांत येत नाही आणि मी वाचीत राहतो. आणि जेव्हा लक्षात येतं तेव्हा माझे पाय जमिनीला लागलेले असतात. मी सत्यसृष्टीत आलेला असतो, त्याच वेळी खरं म्हणजे मलाहि झोप आलेली असते. तीच काव्यानंदाची धुंदी अशी कल्पना करून (माझी कल्पना-शक्ति तशी अमाप आहे!) त्याच धुंदीत पलंगावर पडतो. (पण ही मात्र म्हणते पहा आता एकदाचे)

पण माझी तक्रार माझ्या सौ.बद्दल नाही. ती फार शिकलेली नाही. तिने वाङमय वाचलेले नाही, वाचायची आवड नाही. पांच पोरं आणि साहित्यिक (ऐतखाऊ, कानचुकार, भरकटणारे हे सौ. चे प्रतिशब्द) नवरा यांच्यामुळं निर्माण झालेल्या रामरगा-ड्यात तिला वाचायलाहि सवड होत नाही ही तिची तक्रार, आहे. वस्तुत: तिला सवड असते. (हे अर्थात् माझं मत ! कधीच सिद्ध न झालेलं !) वाचण्याऐवजी ती फळीवरचे डबे काढून त्याना चिंच लावून ते घासत बसेल. फळीवर व्यवस्थित लावलेले डबे खाली काढून फळी पुसून पुन्हा व्यवस्थित लावील. वस्तूंची स्थलांतरं करीत बसेल. आणि प्रत्येक नवा 'चेंज' कसा सुंदर साधलाय् हे पटवून देईल. शेजारच्या साळकाया माळकायांकडे जाऊन तिथे नसलेल्यांची उणीदुणी काढील. इतरानी दिलेल्या बातम्या नीट लक्ष देऊन ऐकेल. आणि त्याना स्वत:चा मीठमसाला लावून त्या दुसऱ्याना ऐकवील. माहेरचं तेच ते पुराण लावीत बसेल. आणि आमच्या नातेवाईकांची (नसलेली–माझे नम्र मत) उणीदुणी काढील. या व अशाच प्रकारच्या 'महत्वाच्या' कामासाठी तिला भरपूर वेळ असतो. पण माझं लिखाण वाचील तर शपथ. गळ्यात पडलेल्या संसाराचं एक अपरिहार्य अंग (आमचा प्रीति-विवाह झालेला आहे!) म्हणून तिच्या ह्या 'अंगा'कडे मला दुर्लक्ष करावं लागतं. नाहीतर 'प्रेमळ' अहेर मिळतो. गंगायमुनांचा पूर येण्याची शक्यता असते. "आम्ही मेली माया लावायची अन् पुरुषांनी मेलं असं वागायचं"–हेही नेहमीचच. नको त्या खपल्या निघतात आणि त्या वाहू लागतात.

तेव्हा सौ. बद्दल मला काहीच म्हणायचं नाही. काही म्हणून उपयोगहि नाही. ती काही ऐकतहि नाही. 'राम रडतोय् वाटतं?' 'सीताकाकू हाक मारताहेत' अशा सबबींखाली ती माझा मारा नेमका चुकवते. इतके वर्षांच्या सहवासाने, कपाळावर आठ्या चढविल्या, एकदम स्तब्ध झालो की, मी रागाने बोलायला सुर-वात करणार हे ती सहज हेरते आणि शरणागति पत्करून पळ काढते. ('काय लागायचं नादाला?' हे तिचे स्पष्टीकरण.) त्यामुळे मला काही बोलावंच लागत नाही. शिवाय मी लिहायला बसलो की, ती मुलानाहि माझ्याकडे फिरकू देत नाही. मुलगा रडत असला, खायला मागत असला म्हणजे ती त्याला सांगते, "पपा लिहायला बसलेत हं! गप्प!" आश्चर्य हे, की तो गप्प होतो. त्यामुळं मी लिहितोय् म्हणजे काहीतरी भयंकर गोष्ट करतोय्, अशीच त्या पोरांची तिने उगाच समजूत करून दिली आहे. माझ्या लिहिण्याचा मुलाना धाक दाखविण्यासाठी आणि माझ्या कुरकुरीतून सुटण्यासाठी, तसंच कागदांचा 'अनंत' कारणां-साठी उपयोग होण्यासारखा असल्यामुळे ती कोणत्याहि प्रकाराने माझ्या लेखनाला अडथळा करीत नाही. उलट मांझ्या लिखाणाची भरपूर स्तुति करून [ते न वाचताच संपादकानी नोंद घेऊन परीक्षणांसाठी पुस्तकं द्यायला (माझी) हरकत नाही!] मी कधी 'कर्ण' झालो (कसं कुणास ठाऊक, बायका हे बरोबर हुडकतात) की, हळूच आपल्याला हव्या असलेल्या वस्तू ती माझ्याकडून उकळते. 'साभार परत' या धोक्याच्या कागदाने मला मग ती चूक आठवते. पण तोपर्यंत माझ्या रागाचा रोख संपादकांवर वळलेला असतो. आमची सौ. त्यातून शिरसलामत (व 'गांल'-सलामत) सुटते.






एवंगुणविशिष्ट सौ. वर माझा मुळीच राग नाही. कारण तिची भूमिका ही नेहमी तटस्थतेची असते. ती माझी जास्त स्तुतीहि करीत नाही अगर माझ्यावर टीकाहि करीत नाही. निदान पक्षी वाटेल तेव्हा तर नाहीच नाही. (सात जन्म संसार करायचा असतो ना आर्य स्त्रीला)

माझ्या मित्रांवरहि माझा राग नाही. 'साभार परत' या धोक्याच्या निशाणीने परत आलेले माझे साहित्य उच्च दर्जा-चेच आहे, संपादकाच्या शैक्षणिक आणि बौद्धिक पातळीच्या वरचे ते आहे, अशाप्रकारे माझ्या जखमांवर फुंकर घालण्याचा त्यांचा प्रयत्न नेहमीच चाललेला असतो. ( A friend in need ही म्हण आठवावी) त्याबद्दलचा त्यांचा मोबदलाहि फार मोठा नसतो. चहा आणि चहाबरोबर इतर 'थोडसं' ('थोडसं' याला किंमतीचं अगर परिमाणाचं काहीच बंधन नसतं हे सूज्ञास सांगणे नलगे!) मिळालं——ते देण्याची तयारी मला ठेवावीच लागते–( friend indeed ना! ) म्हणजे ते खूप असतात. मग मला वाटेल तेवढा मोठा साहित्यिक बनविण्याची त्यांची तयारी असते. त्यांचा हा शहाणपणाचा मार्ग (कावा असं म्हणवत नाही) मला कळतो, पण वळत नाही. शिवाय माझ्या दृष्टीने मी आखलेला माझा प्रगतीचा मार्ग ते कधीच रोखून धरीत नाहीत. निरनिराळ्या कारणांमुळे मला चौफेर वाचन करावं लागतं. त्यामुळे साहित्यातला एक दर्दी वाचक, तज्ज्ञ रसिक अशा रीतीने ते नेहमीच माझ्याकडे आशेने——त्यांच्या नजरेचा खरा अर्थ मला अजूनहि कळलेला नाही–पाहत असतात. आपा-पल्या परीने माझ्याबरोबर वाङमयीन चर्चा करीत बसतात आणि (कंटाळा आला म्हणजे) माझं म्हणणं पटलं असं भासवून किंवा काहीतरी कारण काढून निघूनहि जातात. (तेव्हाचा त्यांच्या चेहऱ्यावरचा भाव मात्र मला 'कळतो')

तेव्हा माझ्या मित्रांवरहि माझा राग नाही. माझा राग आहे तो—— पण माझी भूमिका आणि कामगिरीच मी प्रथम स्पष्ट करतो:

मला साहित्याची फार आवड आहे. मराठी ही माझी मातृ-भाषा असल्यामुळे माझ्या समजुतीप्रमाणे माझं मराठीचं वाचन चौफेर आहे. साहित्याचे सारे प्रकार मी वाचले आहेत. त्यामुळे मराठीमधल्या कोणत्याहि वाङमयप्रकाराचं लेखन ही फार सोपी गोष्ट आहे, ही माझी प्रामाणिक समजूत आहे. शिवाय मराठी शाळेमध्ये असताना शाळेच्या हस्तलिखितामध्ये हस्त-लिखिताला उद्देशून लिहिलेली माझी कविता सुरुवातीला घेतली गेल्यामुळे व इतरहि हस्तलिखितांमध्ये नामवंत साहित्यिकांच्या साहित्याशी बरेच साम्य वाटेल, अशा प्रकारचं लिखाण मी प्रसिद्ध 'करवून' घेतल्यामुळं बालसाहित्यिक म्हणून माझा दबदबा निदान त्या शाळेत तरी झाला होता. वाचलेलेच अगडबंब शब्द अर्थाचा फारसा विचार न करता संधी सापडेल तसे माझ्या बोलण्यातहि मी 'दडपून' देऊ लागलो. त्यामुळे बालसोबत्यांमध्ये मी फार मोठ्या अपेक्षा निर्माण केल्या होत्या.

हायस्कूलमध्ये असताना अभ्यासाबरोबरच माझं वाचनहि कोणताहि पंक्तिप्रपंच न बाळगता चालू होतं. मराठीमध्ये मला सर्वात जास्त मार्क मिळत. त्यामुळेहि माझ्या मनात व माझ्या वर्गशिक्षकांच्या मनातहि फार मोठ्या आशा निर्माण झाल्या. त्यामुळेच एक महान, क्रांतिकारक, युगप्रवर्तक (असा काहीतरी) साहित्यिक होण्याचं स्वप्न मी निश्चित केलं आणि त्याप्रमाणे माझी योजना मी आखली.

या योजनेसाठी मी तयारी सुरू केली. एक मोठी वही खरेदी केली. त्यावर मोठ्या अक्षरात लिहिलं—'मी वाचलेल्या पुस्तका-तील सुभाषिते, उतारे व कथानके.' त्यात सुभाषिते, उतारे लिहून ठेऊ लागलो. आणि ती वही सर्वांच्या नजरेला पडेल, अशी खबरदारी घेऊ लागलो. एक स्वाक्षरी-वही पण खरेदी केली आणि मिळेल त्या साहित्यिकाची, पुढाऱ्याची, नट-नटीची, क्रिकेट-पटूची संदेशासह अगर संदेशाविरहित स्वाक्षरी घेऊ लागलो. त्यामुळे मी अनेकांच्या नजरेत भरलो–चांगल्या आणि वाईट अर्थानेहि. पण माझ्या योजनेचं उद्दीष्ट माझ्या नजरेसमोर नेहमी तरळत असल्यामुळे मी माझा हा उद्योग सतत चालू ठेवला. हस्तलिखितं काढणाऱ्यांचे पत्ते मिळवून त्यांच्याकडे माझे लेख पाठवू लागलो. लहान मुलांच्या सदरात गोष्टी, कविता पाठवू लागलो, आणि त्या छापून आल्या की, इतराना तसं आडपडद्याने व आडपडदा समजला नाही तर उघडउघड सुचवू लागलो.

अर्थात् जसजसा मी मोठा होऊ लागलो, नोकरीला लागलो, माझं लग्न झालं, तसतशा माझ्या आकांक्षा उंचावू लागल्या. प्रथितयश साहित्यिकांप्रमाणे मोठमोठ्या मासिकातून कथा-कविता सचित्र प्रसिद्ध व्हाव्या, त्याबद्दल मोबदला मिळावा, कीर्ति व स्तुति मिळावी, कथासंग्रह व कादंबऱ्या प्रसिद्ध व्हाव्या, अतएव मी एक फार मोठा साहित्यिक व्हावं, ही इच्छा, माझ्या मनामध्ये बळावू लागली.

दरम्यान माझं वाचन चालूच होतं. निरनिराळ्या लेखकांची वैशिष्टचं, शैली, वर्णनपद्धति यांचा सूक्ष्म अभ्यास करून या साऱ्यांच्या मिश्रणानं आपली अशी एक लेखनपद्धति, शैली निर्माण करावी, हा माझा प्रयोग मी चालू केला. प्रसिद्ध लेखकांच्या लेखनावर, शैलीवर पूर्वसूरींपैकी कुणाचा तरी 'छाप' असतोच आणि त्यांचा ते 'माझे लेखनगुरु' असा आदरयुक्त उल्लेख वरचेवर करतात. त्यामुळे त्यांच्याकडे वाचक एखाद्या निष्ठावान भक्ताकडे पहावं, तसा पाहतो, हा माझा अनुभव. खरं तर माझा हा प्रयत्न त्यांच्या त्या 'साधने'शी, तपश्चर्येशी बव्हंशी जुळणाराच आहे. तर माझ्यासारखा हा पद्धतशीर प्रयत्न कुणी केल्याचं मराठी साहित्याच्या इतिहासामध्ये, माझ्या माहितीप्रमाणे एकहि उदाहरण नसेल. दुर्दैवाने माझा प्रयोग संपूर्णतः साध्यच झाला नाही. त्यामुळे एकाच कथेमध्ये खांडेकर, फडके, गाडगीळ, गोखले, यांच्या शैलीचा अनिर्बंध संचार होऊ लागला, आणि कुणी खांडेकरांचं, कुणी फडक्यांचं, कुणी गोखल्यांचं नांव घेऊन








त्यांची तसलीच गोष्ट केव्हातरी, कुठेतरी वाचल्याचा छातीवर हात ठेवून निर्वाळा देऊ लागला. पण प्रत्येकाच्या गोष्टीतला एखादा परिच्छेद उचलून तो एका विशिष्ट पद्धतीने ठेवून मी माझी दिलखेचक कथा सजवू लागलो. माझ्या मते, याला एक विशिष्ट बौद्धिक पातळी लागते. हा प्रयोग माझ्याखेरीज कुणी करून पाहिल्याचे माझ्या वचनात तरी नाही. त्याला तसाच दर्दी वाचक, रसिक लागतो. विनय सोडून स्पष्ट बोलायचं, तर तो पहिला दर्दी वाचक, रसीक मीच आहे.

कथालेखनाच्या ह्या प्रयोगामध्ये मी हल्ली पुढची पायरी गाठली आहे. साहित्य लिहिण्यापूर्वी जाणीवपूर्वक फार वाचन करायला हवं, त्याच समतोल बुद्धीनं समीक्षण करायला हवं, रसिक वृत्तीनं आस्वाद घ्यायला हवा, हा प्रथितयशांचा उदयोन्मुखाना नेहमी दिला जाणारा संदेश मी अगदी काटेकोरपणानं अंमलात आणीत असतो. म्हणजे असं: गोष्ट वाचताना ह्यातल्या कुठल्या परिच्छेदाचा आपल्या आगामी कथेत उपयोग करता येईल, यातली सुभाषितं त्या कथेमध्ये कोणत्या संदर्भात टाकली म्हणजे परिणामकारक ठरतील, याचं अगदी समतोल बुद्धीनं परिक्षण आणि निरीक्षण मी मनोमन करीत असतो. म्हणजे एक गोष्ट वाचताना मी त्याचबरोबर दुसरी कथा मनातल्या मनात रंगवीत असतो. (प्रथितयश लेखकसुद्धा त्यांच्याहून प्रथितयशांचं किंवा परकीय भाषातलं साहित्य याचसाठी वाचीत असावेत. निदान कल्पना सुचण्यासाठी तरी! —हा, आपला माझा अंदाज! ज्याचा त्याने पारखून घ्यावा) मला वाटतं, एवढी स्थितप्रज्ञता आणि जागरुकता अगदी टीकाकारसुद्धा दाखवीत नसतील. त्यामुळे वाचन, मनन आणि जनन या तिन्ही क्रिया मी एकसमयावच्छेदे करीत असतो. (यातून निर्मितीची प्रक्रिया ध्यानी यावी) पण यालाहि एक प्रकारची बौद्धिक पातळी लागते. ती असलेल्या टीकाकारांना एक नवीन विषय—उदा. वाङ्मयप्रसूति, कारण आणि क्रिया—विषय देणाऱ्या मलाहि प्रसिद्धि मिळावी (हक्काने.)

नवकथा, नवकाव्य या नवप्रकारानी मला एक नवी दृष्टि दिली. नवकथा आणि नवकाव्यं वाचीत असताना मला एक गोष्ट कळून चुकली. ती ही की, नवकथेच्या पृथक्करणातून नवकाव्य निर्माण करता येणं शक्य आहे आणि नवकाव्याच्या एक किंवा अनेक प्रतिमा निरनिराळ्या संदर्भामध्ये घोळघोळवून एक झक्क नवकथा निर्माण करता येईल. वाचकाना ती कळली नाही तर 'तुमची बौद्धिक पातळी तेवढी उंचावली नाही. . .जो अनुभव मी घेतला, तो मलाहि पूर्णपणे आकलन झाला नाही. पण त्याला शब्दात पकडण्याचा मी हा अल्पसा प्रयत्न केला आहे. . . .हा यंत्रयुगाचा, विज्ञानयुगाचा परिणाम आहे. यातील प्रतिमा आणि त्याच्याद्वारे होणारं भावसत्यदर्शन हा यांत्रिक जीवनाचा परिपाक आहे. . .ज्यावेळी मी ही वाङ्मयनिर्मिति केली, त्यावेळी आलेल्या स्फूर्तीतून ही निर्मिती झाली. त्यामुळे यातील काही अनुभवांचं



अनुक्रमणिका

योग्य ते समर्थन मी आता करू शकत नाही. पण ती तुम्ही एकदा वाचा, दोनदा, तीनदा समजेपर्यंत वाचा, तुम्हाला ती निश्चित समजेल." अशाप्रकारे त्याला एक प्रकारच्या गूढतेचा, अलौकिकतेचा साजहि चढविता येणं शक्य आहे. नवकवि किंवा नवकथाकार होण्याचा हा सोपा उपाय मला वाटतं दुसऱ्या कुणाला सुचणंहि शक्य नाही. पुनरुक्तीचा आरोप होईल, पण एक गोष्ट सांगणं आवश्यक आहे, की यालाहि एकप्रकारची विशिष्ट बौद्धिक पातळी लागते. स्पष्टच सांगायचं तर ही उच्च बौद्धिक पातळी माझ्यामध्ये निश्चित आहे.

नवकाव्याने मला दुसऱ्याहि एका दृष्टिकोनातून विचार करण्याची सवय लावलेली आहे. सामान्य गद्य माणूस आपला अनुभव असा व्यक्त करील की, निदान साध्या भाषेत त्याचं म्हणणं लक्षात यावं. पण नवकवि सर्वसामान्य वाचकाला जो अनुभव येणं शक्य आहे किंवा 'माणसाला' जी अनुभूति येणं शक्य आहे, तीच मुळी अशा काही रूपकाच्या द्वारे वाचकांच्यापुढे उभी करायचा प्रयत्न करतात (म्हणजे गोंधळ माजवतात), अशी काही रुपकं, प्रतीकं आणि प्रतिमा वापरतात की, त्यातून अर्थांचं 'हे मोठं' विश्व मधमाशाच्या मोहळासारखं एकदम पुढे यावं आणि त्यातून योग्य अर्थ—निदान आशय अभिव्यक्तिपुरता-तरी—निघणं अशक्य व्हावं ! पर्यायाने वाचकांच्या मनामध्ये परस्परविरोधी अशा कल्पनांचं एक चित्रविचित्र विश्व निर्माण होतं. त्यातला काव्यातील शब्दांच्या सर्वसामान्य रूढ अर्थाला योग्य असा एखादा अनुभव, आशय वाचक निवडतो, आणि मग त्याच्या लक्षात येतं की, कवीला हा अर्थ अभिप्रेत नसावा—कारण कवितेचं शीर्षक, तिचे इतर चरण काही वेगळंच सूचित करतात! मग वाचक भांबावतो. एवंगुणविशिष्ट अशी ती कविता आणि तो कवि अशा रीतीने वाचकाच्या डोक्यावरून जातो!

—अर्थात् हे विषयांतर झालं. तर काय सांगत होतो बरं मी? हां, नवकाव्याने मला एका निराळ्या दृष्टीने विचार करायला लावलं. यातील 'मला' या शब्दाकडे मी लक्ष वेधू इच्छितो. हे जे अर्थाचं विश्व निर्माण होतं, त्यानं किंचित् काळ डोकं दुखलं तरी निरनिराळ्या कल्पना सुचतात. त्यांचा आगामी वाङ्मयात उपयोग करता येतो, हा काही लहानसहान फायदा नाही. 'मला' या शब्दाकडे मी लक्ष वेधतं, याचं कारण हेच ! नववाङ्मयाचा—यात काव्य, कथा, टीका इ. इ. आलंच—हा 'असला' उपयोग कुणाच्या लक्षात आला असेल, असं मला वाटत नाही. माझ्या लक्षात आला, हे मात्र नम्रपणे सांगू इच्छितो. (निदान माझ्या 'पाहाण्या' 'वाचण्यात' नाही)

—हां ! एक गोष्ट मात्र माझ्या हातून झाली नाही. ती माझी चूक आहे, असं मात्र मला वाटत नाही. पण ती एक प्रथम पायरी आहे, ही 'आतली बातमी' काही मला लागली नाही, एवढं खरं! ती म्हणजे आपला एक कंपू स्थापन करणं किंवा दुसऱ्या एखाद्या सुप्रतिष्ठित कंपूत सामील होणं. त्यामुळे साहित्यचर्चेच्या निमित्ताने इतर लेखकांच्या उणीवा काढता येतात. व्यंगांचं, व्यसनांचं, राहणीचं सोईस्कर विडंबन करता येऊन त्याद्वारे आपल्या नावडत्या, आपल्याहून जास्त प्रसिद्धी मिळालेल्या, आपल्यावर टीका करणाऱ्या विरुद्ध बाजूच्या साहित्यिकांची वाङ्मयीन कलाकृति टाकाऊ, वाङ्मयमूल्यहीन अतएव रद्दी ठरविता येते. कंपू-सदस्यांची खुशामत (वाङ्मयीन समीक्षा' हा साहित्यशास्त्रातील सोवळा शब्द!) आणि इतरांची त्या संदर्भामध्ये टवाळी करता येते. स्वतःचा किंवा कंपूचा भगतगण निर्माण करता येतो. एक संप्रदाय निर्माण केल्याचा आव आणि आत्मिक समाधान मिळू शकतं.

याच्याच जोडीला संप्रदायाचं एखादे मासिक, वर्तमानपत्र, नि मानाच्या जागी असलेले सदस्य असले म्हणजे हे संप्रदायनिर्मितीचं काम विशेष सोपं होतं. इतरांवर त्यामुळे विसंबून रहावं लागत नाही. स्वसाहित्यावर चर्चा घडवून आणणं, सत्कार करवून घेणं, एखादा खिशातला टीकाकार असणं, टीकाकाराशी घनिष्ट संबंध ठेवणं, संपादकांच्या ओळखी काढणं, करवून घेणं, वाढवीत राहणं, खुशामती करणं, इत्यादि अनेक यशस्वी साहित्य-जीवनाच्या पायऱ्या आहेत, हे कुणी मला सांगितलं नाही किंवा मलाहि त्यांचा कुठे वास आला नाही. त्यामुळं मी त्यांचा शोधहि केला नाही. माझ्या प्रतिभेबद्दल, वाङ्मयीन कर्तृत्वाबद्दल फार मोठ्या अपेक्षा मी बाळगल्या होत्या. त्यादृष्टीने माझी स्वतंत्र अशी वाटचाल (तीच आडवाट ठरली ! ) मी चालू ठेवली होती. कारण माझा आत्मविश्वास—'हम भी कुछ कम नहीं' ही जाणीव!

तसंच अंगच्या स्पष्टवक्तेपणामुळे, फुकटची पदरमोड करावी लागल्याच्या अनुभवामुळे, नसती व्यसनं लागण्याच्या शक्यतेमुळे, आणि कंपूशाहीतल्या भोंगळपणामुळे अशा प्रकारच्या कंपूपासून मी चार पावलं दूरच राहिलो. याला माझा लाजरा, संकोची आणि मर्यादशील स्वभावहि काही अंशी कारणीभूत झाला.

लेखक हा एक स्वयंभू देव आहे—त्याला भगतगणांची आवश्यकता नाही. तो लिखाणापुरता का होईना, पण एकांतप्रिय आहे—त्याला समूह नको असतो. (कोणातरी मोठ्या लेखकाचं हे वाक्य आहे.) लोकसमूहात राहूनहि तो लोकसमूहात नसतो. तो जीवनाचा भाष्यकार आहे—संपादकाचा खुषमस्कऱ्या नाही! तो कलेचा भक्त असतो—त्याला कुणी विकत घेऊ शकत नाही—(ही अर्थात् माझी तत्त्वं आहेत.) दुर्दैवाने—माझ्या आणि मराठी साहित्याच्या—या तत्वांचा बोज राखला जात नाही.

—ही माझी तक्रार आहे—ही माझी व्यथा आहे—ही माझी जाऊ द्या. शब्द असमर्थ ठरतील ते सांगायला ! इतकी ती आंतरिक, अमोल आहे! एका प्रयोगशील लेखकाच्या व्यथेची ही कथा आहे !

—तरीहि मी निराश झालेलो नाही. साहित्यावर माझं प्रेम आहे आणि ते प्रेमच माझ्याकडून निरनिराळे प्रयोग करवून घेत असते. (मी तो निमित्तमात्र!) कुणी सांगावं, भविष्यकाळात काही भरीव, नेत्रदीपक अशी कामगिरी माझ्याकडून होईलहि—

—कारण काल अमर्याद आहे व पृथ्वी विशाल आहे! 'रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उषःकाल!'

• • •







अनुक्रमणिका




तेचा बाजार उरकला, लाडू, बटर बिस्कूट, तेलाचे शिसे सारं घेऊन झालं. शिरप्याचा बाजा फक्त राह्यला. तो घेऊन ती निघाली त्यापेक्षा उत्साहाने घरी परतणार होती. पण... ....

—माधव सराफ



**डालग्यावूडच्या** कोंब्यानं खोपीचं छप्पर फाटेस्तोवर बांग द्यायला भितूरल्या पाखरांची फडफड सुरू झाली. कोंबा खिनभर गप्प बसंना. एकसारखा बांग देत सुटला.डालग्यापासनं कासराभर अंतरावर झोपलेल्या यशोदेला जाग आली. तिच्या कवेत वाकळात शिरपा, धाकला गना आन् कमळी ब्येस मुरकटली होती. गुळमाट झ्वाप सोडून उठवेना. पण आठवडयाच्या बाजाराला तालुक्याच्या ठिकाणाला जायचं होतं. वाडूळ लावून भागणार नव्हतं.

वाकळातनं यशोदेनं अंग मोकळं केलं. अवघडलेली हाडं कटाटा मोडली. वाळक्या केसाचा बुचडा सारखा केला. पोरास्नी अंगावरल्या वाकळेची सुद्द नव्हती. खोळीमधनं कापूस डोकावल्यागत लेकरांची उघडीनागडी अंगं वाकळेभाईर होती. त्यासनी सप्पय झोपवूनशान यशोदा कामगतीला लागली. लगा लगा, डालगं उंचावलं तशी समदी पाखरं कॅक्..कॅक्...करत भन्नाटा पळाली आन् खोपीलगत उकऱ्या काढीत राहिली. दातावरनं मशेरीचं बोट फिरलं. काजाळलेला तवा पिंजरानं गोंबरासंगं खासासा घासला..घस खराडला. चुलीचं सारवण झालं. गाईची पावलं रांगोळीन रेखली. काटक्यांची मोळी उस्तारली. शेणकूटं आन् काटक्या चुलीत सारल्या. चिमणीचं त्याल गळवलं. नारळाच्या करटया शेणकूटाला चिटकल्या. जुंधळयाचं पीठ परातीत क्ष्याक भिजलं. काडी ओढायला. चुलीत धगाटा झाला. करटया फुरफुरल्या. भाकऱ्या टम्

अनुक्रमणिका

फुगल्या. हां हां म्हणता भगाटायला लागलं. टोपलींत भाकरीची चळत पडली. जाळ संपायला धूर झाला. शिरपाची झ्वाप उडाली. पोरगं वाकळातच हलगुमुलगु करत जांभळचा पिरगाळत होतं.

ओठ पिरगाळून दुध काढावं एवढं शिरपाचं लहानपण! सुदमूद आईच्या वळीवर हळदीच्या कोंबागत गोरंगोमटं. ओठावर काळी रेघ उमटायला अवधी असलेलं. लेकरू तिकडम डोक्याचं, पण यशोदेला कामगतीत मदतीला बाप्या मानसापरीस म्होरं न्हायाचं. शिरपाच्या पाठीवरला गना जेमतेम पाचवं वरीस लागलेला. अजूनवी त्याच्या ढुंगणावर पाणी घालावं लागे. गनाच्या मागनं वर्षाभरातच कमळी उपाजली. आन् ती उपडी रांगायच्या आधीच पटकीनं यशोदेचा दादला सोपला होता. लेकरांचं त्रिदळ यशोदेच्या फाटक्या पदरात, बांधून. . .समदा भार यशोदेवर टाकून! घरचा गाडा असा लंगडा झालेल्याला दोन वरीसदिकून झाली नव्हती. पोटापाण्याची भिस्त दीड एकर मळ्यावर. काळचा आईनं किरपा करावी तंव्वाच चूल न्याट पेटावी. आजचा दिसतर झ्याक भगाटला. वैलावर भगुल्यात गंजी रटरटली. भाकरी बडवून चूल थंड व्हायला धूरानं खोपी भरली. शिरपाची खूडबूड ऐकून यशोदेनं त्याला हाळी दिली,

'शिरपा राजा, ऊठ पोरा, आज बाजार हाय न्हवं?"

"जराशानं उठलं तर चालायचं न्हाई? गनाकमळीबी ठार झोपल्यात. . .माजबी लय थंड वाजतिया तंव्वा. . . ."

"आरं पन्, माज्या राजा, चिटमिटक्या तोडायच्या – हायिल्यात . . . .वायंगीबी तोडपाला आल्यात, तुज्याबिगर समदी कामगत एकलीला कंची होनार? माजा राजा हाय म्हनून कंचीदिकून फिकीर न्हाई. . ."

लाडेलाडे, शिरपाला गोंजारताच तो हुराळला आन् लाडात म्हणाला,

"पन् अवश्ये, माज बाजारातनं काय आनशील?"

"चिरमुरीच लाडु!"

"न्हवं!"

"मिरशांगीचे फुग्ये?"

"न्हाई, न्हाई! खायाप्याचं कायबी न्हाई. अत्तंतरी वळकशील?"

"भोगरा, चंडु, लोकंडाचं चक्कर न्हायितर पतंगाचा मांजा असंल!"

"छ्या, छ्या, ह्यांतलं योकबी न्हाई! हरलो म्हन!"

"तुजीच जीत पोरा, अत्तंतरी मनचं सांगशील?"

"आन घ्ये, बघ. . . .हां. . .मागनं न्हाय म्हनलीस तर तुज्यासंगं बोलनंच बंद व्हयिल!"

"देवाच्यान न्हाई पोरा, माज्या हाताभितुरली गोट असंलतर म्या न्हाय म्हणनार न्हाई. . ."

"ऐक तर अवश्ये, इनामदाराचा बंडा सावकार वाजवतोया तसला माज बाजा पायजे" ओठावरून् बोटं फिरवत शिरपानं बाजा वाजवून दावला.

"हात्तेच्या, चारसा गिनीमही तसला बाजा गावंल. सांच्यापारी राजाच्या हातात बाजा ठेवूनशान येला म्हंजे झालं?" असं म्हणत यशोदेनं पदराला गाठ मारली.

"अवश्ये, तुया लयी चकोट हायिस गेऽऽऽ" असं म्हणतच शिरपा वाकळेभाईर सरला आन् एकदम छलांग मारून मळ्यातला विहिरीकडं धुमाट पळाला.

अमळशानं मायलेक चिटमिटक्या तोडू लागली. शेंगाचं पंक आडदांड पोसल्यालं. गवारीच्या शेंगा खुडताना चुटचुटल्या. अर्ध्या घंटयांतच दोन मोठी शिपतरं गवारीनं भरली. खूटाची वायंगी अवंदा टच भरली होती. 'भरताची वांगी' म्हणत समदे बामण ह्या वायंग्यावर बाजारात तुटून पडायचे. शिरपानं धावीस फळांचं तोडपं सटासट् झाडं न दुखावता केलं. बुरडी बुट्टीत शेंगा भरल्या. गवारीवर वायंगी झोकात बसली. बुट्टीच्या तोंडावर जुनेराचं फटकुरं अंबाडीच्या दोरानं करकचून आवळलं. तेलाला शिसे खुपासले. बाजाराची तयारी झाली.

शिरपानं साजरीच बुट्टी सजविलेली बघून, मोटेचं पाणी खळखळल्यागत यशोदा हसली. मायेनं, कानशिलाची बोटं वाजवत शिरपाला ती म्हणाली,

"माजा राजा असा गुनी हाय म्हनून माज कायबी कमती न्हाई. माज्या पोरा, गनाकमळीला उठीव अत्तं. . .भाकरी खावूनशान जल्दीनं बाजाराची वाट धराया होवी. . .वाडूळ नगं लावू. . ."

शिरपा तरातरा खोपीत शिरला. आन् सर्रकन् जनाकमळीच्या अंगावरली वाकळ पाण्यातलं जाळं ओढल्यागत खेचून त्यानं भिरकाटली. पोटावर गुदगुल्या करून भावंडांना उठवलं. त्यांची पिठूळ त्वांडं खंगाळून अवश्येम्होरं बसविलं. कमळीचा गाल कुस्करून यशोदेनं तिला मांडीवर घेतलं. टीनपाटातील गुळाच्या डिकळाचे खडे केले. गुळासंगं समदी चवीनं भाकरी खाऊ लागली. भरपेट न्याहरीमागनं खापऱ्यातल्या पाण्यानं तळीराम गार झाला. यशोदा बाजाराला निघाली.

"माज बटर बिस्कुट, चिरमुरीचे लाडु आन हां. . ." गणानं वजावलं.

"आन् तुज काय आनु कमळचे?" कमळी निसतीच खळी पाडून हसली.

"रोटावर लय जीव हाय तुजा, तंव्वा रानीला रोट आनीन हां. . . आन् लालभडक काकनंबी. . ."

"माजा बाजा इसरू नगं हां अवश्ये, माजी आन हाय बग. . .बंडा सावकार वजावतोया तसला बाजा हां. . .न्हायितर तुज्यासंगं बोलनं बंद!" शिरपानं पुन्यांदा बाजाची याद दिली. चुंबळ डोईवर बसलं. म्होरं होवूनशान शिरपानं बुट्टीचं वज्जं वावलं.

"येतो पोरानु. . .शिरपा, गनाकमळीवर ध्यान ठेव. . .हीरीवर नगं जाऊ. . दोपाराला वैलावरली गंजी वाढून जेवा समदी. . .दिवळीत लोंच्याची भरनी हाय. . . ."

लेकरांना निरोप देवून, भुंड्या पावलानं यशोदा बाजाराच्या वाटेला लागली. सहा मैलाचं अंतर डोईवरल्या वज्या-






निशी काटताना तिचा झेंडू फुटला. चोळीची पाठ घामानं ओलीचिंब झाली. पाठीची पन्हाळं ठिबकू लागली. कमरेलगत दुमडलेली, पोटावरली गोरीपान, मांसल वळी घामानं न्हावून निघाली. चेहऱ्याची लिबकांति गुलमोहरागत लालसर झाली. हां. . हां म्हणता तालुक्याचं ठिकाण आलं.

बाजारात माणसं माणसाला चिटकली होती. सडकेच्या किनाऱ्याला लागूनच दुतर्फा बाजार भरलेला होता. मोक्याच्या जागा माळणींनी आधीच धरल्या होत्या. नाम्या शिंप्याच्या कट्ट्यालगत वावभर जागा होती. चार वांगी फुकटात देण्याच्या बोलीवर नाम्यानं यशोदेला दुकानसमोर बसू दिलं. वज्जं भूईवर उतरताना, घाऱ्या डोळ्याच्या नाम्यानं तिला हिरव्या नजरेनं निरखलं. यशोदेनं लगालगा, जुनेराचं चौपदरी फडकं सडकेवर पसरलं. बचकेनं शेंगाचे धुंफे हारीनं फडक्यावर लावले. गिऱ्हाईकांच्या नजरेत शेंगा वक्कळ लावल्यागत भराव्या म्हणून धुंफे बोटानं दाबून पसरट केले. बुट्टींतली तुकतुकीत टंच वांगी बघून बामणं धावून आलीं. गिनीला एक ह्या भावानं सगळी वांगी झटपट वोपली. एकदोन बाप्यानी डोळा चुकवून चारसहा वांगी वेधडक चोरून फळवली ! ग्रामपंचायतीच्या शिपायानं "सडकेचं भाडं" म्हणून पांचसहा वांगी निवडून वेचली. नाम्या शिंप्यानं सर्वां-आधी चार वांगी लाटून झ्याक वोनी केल्याचा हा परिणाम ! वांगी वोपून बारा आनं जमलं. गवारीचा दीड रुपया जमला. यशोदेच्या चोळीच्या बाहीत सव्वा दोन रुपयाचं भांडवल जमा झालं. ह्यांतनंच आठवडयाचा बाजार करायचा होता. राकेल, येशेल, तिकाटमीट, हळद, काडीचा डब्बा, मसाल्याची पुडी, च्याची पावडर, काकनं, चिरमुरीचे लाडु, बटर बिसकूट, रोट आन् शिरपाचा बाजा एवढा हिशेब पुरा व्हायचा होता.

सूर्य डोईवर आला तसा उन्हाचा तकाटा वाढला. बाजार वायावाप्यानी फुलून गेला होता. सोडालेमन विकणारी पोरं नरडं खरडून आरडत होती. तहानेनं यशोदेचा जीव फेंसाटीला आला होता. सोडयाच्या बाटलीनं तहान भागणार होती. पण चोळीच्या दंडावरली पैक्याची गाठ आवळ्याएवढी वघून यशोदेनं आवंढा गिळला. तिनं नाम्या शिप्याकडं पाणी मागितलं. नाम्या तिच्या वंजळीत तांव्यानं पाणी घालू लागला. यशोदा वाकल्यामुळे तिची चोळी गळ्याखाली सैल पडली होती. तिच्या धपापणाऱ्या छातीकडे नाम्या एकटक पहात राहिला. केळीच्या कोवळ्यागत गच्चमुच छाती वघून त्याचं भान हरपलं. पाण्याची धार वंजळीत पडंना. पाणी चोळीच्या पोकळीत पडायला माघारी सरून यशोदेनं नाम्याला डाफरलं.

"सुक्काळीच्या, विनडोरल्याची बगूनशान असले धंदे करतुयास व्हय रे? म्या काय तमाशातली नाचणारी हाय व्हय रे गंजाड्याऽऽ! पुन्यांदा डोळं वर कर म्हंजे कावळ्याची नदर फोडीन मुड्द्या. . . ."

चवताळलेली नागीण डसण्याआधीच नाम्यानं शेपूट घातलं. कालवा होवून गर्दी जमण्यापूर्वीच थोवाथोवा करून चुकी कबूल केली.

"असल्ये कावळे बघिटले हायित छप्पन!" असं म्हणतच यशोदा लुगुलुगु गर्दीत मिसळली. कासारापुढं हात ठेवून तिनं मोरपंखी रंगाची काकणं भरून घेतली. केळीच्या गाभ्यागत कवकवीत हात वघून कासारदेखील पेटला. यशोदेचं अप्रूप रूप निरखत आन् वाळल्या फालतु गोष्टी करत वेळ काढून तिची मनगटं धुंद होवून बळेच दावू लागला. निसकारनी काकणं वाढवू लागला. कासाराचं वागणं तिच्या तर्कात नव्हतं. न्हाईतर त्याला भोसकटून तिनं त्याला हिरवा भाजून खाल्ला असता. कमळीसाठी लालचुटूक काकणं घेवून यशोदेनं कासाराच्या गाळ्यातून पावलीची खरेदी करून काढता पाय घेतला. उफाड्या अंगाच्या तिच्या पाठमोऱ्या आकृतीवर ध्यान ठेवून कासार अधिकच पेटू लागला.

यशोदेनं लहू वाण्याचं दुकान गाठलं. सुईपासून मेदरी बुट्ट्यापर्यंत एकजात सगळं सामान ह्या दुकानात मिळायचं. दुकान ठासून भरलं होतं. नोकरचाकर मोप होते. गिऱ्हाईकांची झिम्मड होती. प्रत्येकाकडं ध्यान द्यायला वाण्याला सुचत

गेले ते दिवस !




"खरोखर, त्यावेळचे चित्रकार खरे 'स्त्री ऽऽत्व' चित्रात घालत असत......नाही !"

नव्हतं. गडी भराभर माल तोलत होते. वाणी बैठकीच्या गादीखाली नोटा सारा-रचा. पेटी उघडून एका दमात चिल्लर मोजून द्यायचा आन् चुटकीसरशी हिशेब सांगायचा. दुकानाच्या छताला रंगीबेरंगी खेळणी लोंबत होती. फुगऱ्या अंगाचं बदक, डोळं वटारून बघणारं कुत्रं, मडमी फॅशनच्या बाहुल्या, सोंड हलवणारा हत्ती, सातरंगी चेंडू अशी खेळणी पाहून यशोदेचे डोळे दिपले.

"आक्कासनी काय पायजे?" असं लहु वाण्यानं जेव्हा विचारलं तेव्हा ती भाना-वर आली. यादीप्रमाणं नोकरानी सामा-नाच्या पुड्या बुट्टीत मोजून टाकल्या. तेलाचे शिसे कणसाच्या तुकड्याच्या बुचानं जाम बंद केले. दीड रुपयाचा हिशेब चुकता झाला. पैक्याची गाठ सैल झाली. फकस्त आठ आनं शिल्लक राहिलं. पदराच्या गाठीला हात लागा-यला यशोदेला बाजाची सय झाली. तशी ती वाण्याला म्हणाली,

"दादा, एक बाजावी पायजे व्हता..."

"पन् आक्का, तुमास्नी कंचा बाजा पायजे?"

"इनामदाराचं बंदा सावकार वाजव-त्यात तसला घेवा बगा..."

"कंच्या गावचं आक्का? गावोगाव लय पासरीनं इनामदार पडल्यात... आन् बंडा नावाची पोरंदिकून रगड भरल्यात तालुकाभर..."

वाणी पोटावर खड्डा पाडून हसत बोलला, "अवो, गारुडयाच्या पुंगीवानी वाजतुया बगा, तसला बाजा पायजे."

"समाजलं आक्का, आरं संभाऽऽऽ जत्मनचे इयाकपैकी बाजे दाव आक्कासनी."

संभानं पेटीतून पाचसहा बाजे काढून यशोदपुढे ठेवले. एक बाजा संभानं वाजवून दावला. बंडा सावकाराचा बाजा असाच वाजतुया. संभाच्या ठिकाणी खिन-भर तिला शिरपा दिसला. तशी यशोदा भारावून गेली.

"ह्याला काय खर्ची पडंल?"

"अडीच रुपय, आक्का." अंगाभायेरली किमत ऐकून यशोदा गप्पगार झाली.

"द्याचं काय?"

"मागायचं न्हाय आक्का. योकच भाव! लहुशेठचं दुकान म्हणत्यात ह्याला......लैनावरला हातगाडीवरला गावठी माल न्होवं हा आक्का... असा चकोट जत्मन माल लहुशेठच्या दुकाना-बिगर कुटंबी मिळणार न्हाई" दाढीची खुटरं खाजवीत, संभा मालकाची थोरवी सांगत होता.

अत्तं काय करावं नसिबाला? शिर-पाचा हिरमोड करायचा? बाजाच्या आशेपायी बाप्या मानसापरीस लेकरानं येरवाळी अंगमोड केली! त्ये प्वार माज्या वाटेकडे डोळे लावून असंल! पन् पैका न्हाईतर बाजा कंचा गावनार? पोरगंदिकून तापीट सोभावाचं! संभा तर अत्तं आतल्या अंगाकडं गूळ जोकतुया... दुकानाच्या फळीवर सा-सात बाजे हायित... ह्यातला योक उचलला तर? यद्दळ माजी गरीबाची धा-पाच वायंगीबी बामणानी पळवली व्हती! लहुशेठतर नोटा बुडाखाल ढकलूनशान लक्ष्मीवर बसतुया.... ह्यातला योक बाज्या म्या उचालला म्हनून त्येची इशेश काय लुक-सानी व्हनार हाय? यशोदेच्या मनात कायधूळ उठलं. थरथरत्या हातानं फळी-वरचा एक बाजा यशोदेनं बुट्टीत हळूच सारला. आन् "दादा, ह्याची खर्ची माज्या अंगाभाईर हाय बाबानु... ठेवून द्या बाजं" असं म्हणत डोईवर बुट्टी घेवून ती वाण्याच्या दुकानातून सटकली. यशोदेला घाम फुटला. आपल्या मनाच्या हीनपणाबद्दल तिला कीळस आली. छाती धपापत होती. दुकानापासनं कासराभर अंतरावर आल्यावर तिला हायसं वाटलं. गर्दीतून वाट काढत यशोदा तरातरा चालली होती. आन् इतक्यातच पाठनं पदराला ओढ लागली. सर्रकन् तिचा पदर ओढला गेला. तोल जावून यशोदा रप्दिशी भूईवर कोसळली. बुट्टीतले लाडू मातीत उघळले. तेलाचे शिसे फुटून बुट्टीचा बूड तेलानं लडबडला.



### पात्रटिका

**श्रेष्ठ ख्याल !**

**एक होता गवई**
**तबलजीचा जावई**
**एक दिवस दोघांमंदी**
**चांगलीच झाली जुगलबंदी**
**तबलजीचा एकच ठोका**
**ख्यालात ख्याल कोणता ख्याल**
**तान मारून गवई बोले**
**ख्यालात ख्याल बाहेरख्याल**

**—ह. शि. खरात**

सामानाच्या पुड्या तेलात बुडून त्याचा झुनका झाला. सूर्याच्या किरणानं बाजा चमचम तारे फेकत होता. बाजा दिसताच, यशोदेच्या टकुऱ्यावर संभानं बळानिशी थापटी हाणली. आन् एक थोतरीत दिली.

"गतकाळे, डोळं चुकवून चोरी कराया आली व्हतीस व्हय? चल रांडे, चौकीवर... ताकत न्हाई तर कशापायी पायजे व्हते असले छिनाल धंदे..." संभाचं तोंड वाजू लागलं. गोमगाल्यानं गर्दी जमू लागली. यद्दळ आक्का म्हणणारा संभा आयीमायीवरनं खंडीभर शिव्या हासडत होता. जिभेला लाख काटे डसल्यागत यशोदेला बोलनं सुधरेना. सुंद होवून लैनावरच खालच्या मानेनं ती मुकाट बसून होती. गर्दी वाढली तव्हा नाम्या







शिंपीदिकून मिशीन सोडून धुमडीत सामील झाला.

"काय झालं गा?" म्हणून त्यानं संभाला पुसलं.

"रांडमुंडरी हातोहात बाजा चोरून पळून चालली व्हती....."

"रांड लय तावदारीन हाय बगा... म्हंजे बगा..माज्या दुकानासंभूर माज्या गिन्हाईकास्नी अडचन करुनशान येरवाळी भाजी वोपाया दिली... माज्या तांब्यानं हातनं पानी पियाली आन् म्हनं माजी नदर कावळचाची हाय! अत्त चोर कावळा कोन हाय त्ये व्हयील दक्कल! रांडेला घाडून द्येवा पोलिस-कोटरीत...अवो, रांडेनं आज बाजा चोरला...उद्या माजं पाकीट मारील...तिच्या वायलीऽऽऽ हिच्या खोडकीचा कोंबरा मुळासनं मोडून टाकाया व्होवा...म्या हवालदारास्नी बलवून आनतो...तव्वर सोडू नका भिकनेशीxxx..." नाम्या शिंपी बत्तीशी पाजळून चौकीच्या रोखानं निघाला.

यशोदेच्या डोळचात कढत पाणी जमलं होतं. ती डोळं गाळत गुमान बसून राहिली. तिचा आवाज करवतल्यानं चिराकला. गर्दीत म्हातारा मंडलु कुंभार चांदीच्या गलमिशावर मूठ फिरवीत समदा परकार एक चित्तानं वैजवार निरखत, कानाशी काठी धरून चिलीम फुलवत उभा होता. नाम्या शिंपी जाताक्षणीच म्होरं होवून तो संभाला म्हणाला,

"काय संवा, परकरन वाडविनार कीं हितंच भागविनार?"

"माजं कायवी म्हननं न्हाई..नाम्या शिंप्याच्या नादानं कामधंदा सोडून कोर्टकचेरी करायला कोनच्या लेकाला सवड हाय? माजवी पोरंबाळं हायीत आजोबा.."

"म्यावी त्येच म्हनतो गाऽऽ..बायलीचा समदा बाजार इसकटला. त्यी सजा काय कमती हाय? चौकीवर वरदी द्याया बाजा म्हंजे काय बाजाची पेटी न्हवं! सोडून द्येवा बायलीला...ह्यो नाम्या म्हंजे वायंग्यातील कीड हाय निसती..."

कुंभारानं असा धिरावा दिलेला वघून सूपाएवढा काळजाचा आपला बाप पाठीवर उभा राहिल्यागत यशोदेला वाटलं. म्हाताऱ्याच्या पायावर ती पडण्याआधीच संभा म्हणाला:

"हवालदार याच्याआधी गुमान पळ घरला....लय शोभा नको...लाग वाटेला...."

यशोदेच्या पिंड्यात पेटके आले होते. भेलकांडल्यागत पाय टाकून ती कशीवशी उठली. नागवी पावलं बेंड्या पडल्यागत जडशीळ झाली. कोणाच्याबी नजरेला नजर न देता खालमुंडीनंच ती गावाच्या सडकेला लागली. डोईवरली रिकामी बुट्टी तिला मणभर वज्ज्यागत वाटून तोलवत नव्हती.

● ● ●






# कुंचला आणि लेखणीची रसीली जुगलबंदी !



म रा ठी ती ल  ए क मे व  (द र्जे दा र)  मा सि का चा

## २२ वा वार्षिक दिवाळी विशेषांक

मराठीतील अग्रगण्य साहित्यिकांपासून विटनिकांपर्यंत
सर्वांच्या सहकार्याने - १ नोव्हेंबर रोजी प्रसिद्ध होणार !

नवकल्पनांच्या
**६ रंगरंगील्या कलाकृति**



मुखपृष्ठावरील
**मोरपिशी किमया**



**१६ पानांच्या तीन दुरंगी बिंगचित्रमाला**

अस्वली गुदगुल्या करणारे

**साहित्यातील 'चालू नाके'**

प्रचलित राजकीय ढोंगबाजीवर कोरडे
ओढणारी बेफाम व्यंगचित्रकथा

**गाढवासकट ब्रम्हचर्य गेले !**

( भारतीय राजकारण्यांचे अवमूल्यन )

महाराष्ट्रा, दिवस वैऱ्याचे आहेत
जागा रहा !

**यंडू गुंडू आणि बंडू !**

मूल्य
३॥ रुपये
+ १। रु. र. पो.

महागाई आणि टंचाईच्या काळातहि—एकवीस वर्षांच्या
थोर परंपरेनुसार—एकमेवाद्वितीय असाच प्रसिद्ध होणार !!







--अ. अं. कुलकर्णी





**धोंडो गुंडो तसा काही लेचापेचा असामी नव्हता. कोर्ट-वकील यांच्यात उभी हयात काढलेला मुरब्बी गडी तो. प्रत्यक्ष यमाच्या दरबारातहि न डगमगता त्याने चित्रगुप्ताची 'क्रॉस' घ्यायला सुरुवात केली....**

"**रात्रीसाठी** आवडीनं माझ्याकरता पिठलं झाकून ठेवलं असेल. तुमच्या देखत मी आवडीला शब्द दिलाय्, तो मला पाळू द्या" अशी सुरुवातीला विनंति करून धोंडो गुंडो अवचट यानी आपल्या बचावाच्या भाषणाला सुरुवात केली–

"महाराज चित्रगुप्त – खुद्द आपल्याबद्दल, आपल्या त्या प्रसिद्ध वहीबद्दल आणि आपण करीत असलेल्या त्यातील पाप-पुण्यांच्या काटेकोर नोंदीबद्दल आम्ही मृत्यूलोकवासीय वास्त-विक खूप खूप ऐकून आहोत. तुमचा निःपक्षपातीपणा तर विश्व-जाहीर आहे, पण आजच खुद्द आमच्याबद्दलचा जो न्यायनिवाडा या कोर्टात झाला आणि त्याबाबत जो पुरावा आपण न्यायालया-समोर हजर केलात, तो पाहून आम्ही अर्थातच सर्द झालो आहोत. तुमच्या आशीर्वादानं कोर्ट कचेऱ्यांचा भला मोठा अनुभव आमच्या पदरी भरपूर आहे. आमची सारी हयातच कोर्टाच्या भल्याबुऱ्या अनुभवात व्यतीत झालेली आहे. आणि तिची नोंदही आपण आपल्या वहीत केलेली आहे. असे असूनही या कोर्टातला आजचा फैसल्ला ऐकून आम्हास अतीव अचंबा वाटला. आमच्या







# याची देही याची डोळा......

....मागील वेधक वृत्तांत जुलैच्या अंकात आपण वाचला आहेच. यानंतर धोंडो गुंडो यानी प्रत्यक्ष यम-राजाकडूनहि ‘ डिसमिसल् ’ ऑर्डर मिळविली कशी नि काय हिकमती लढवल्या त्याचा याची देही याची डोळा.... याने ‘आय–विटनेस’ रिपोर्ट ऐका....

अनुभवांवर अक्षरशः पाणी पडलेलं आहे. फिर्यादीचे पैसे खाऊ-नही आमच्याकडली कोर्टे इतका एकतर्फी निकाल देण्यास धजली नसती. परवा परवापर्यंत भारतवर्षातील न्यायदान अतिशय काटे-कोर आणि चोख होत असे. सर्वसाधारण माणसाला सत्य बाजूला न्याय मिळणारच असा विश्वास वाटत होता. पण अलि-कडे मात्र हा लौकिक कमी होऊ लागला आहे. कोर्टातील कागदपत्र चोरीला जाणं, पुरावा नष्ट केला जाणं आणि लाचलुच-पतीमुळे खरे गुन्हेगारही सहिसलामत सुटणं असे प्रकार मृत्यु-लोकातही होऊ लागले आहेत. हे असं विपरित कां होऊ लागलं आहे? याचं आम्हा सर्वानाच आश्चर्य वाटू लागलेलं आहे. आज आम्हाला त्याची गोम कशात आहे हे ध्यानी आलं आहे. देवलोकीच्या, प्रत्यक्ष चित्रगुप्ताच्या वहीमध्ये जर आजकाल नीट नोंदी होत नसतील; त्याबाबतच जर अशी चालढकल, अंदा-धुंदी होत असेल आणि प्रत्यक्ष चित्रगुप्ताला जर सत्याची चाड राहिलेली नसेल तर आम्हा मानवांच्या मर्त्यलोकातील यत्किंचित् कोर्ट–कचेऱ्याना कशाला नावं ठेवावयास हवीत? येथील अंदाधुंदीची आणि असत्याची सावट मर्त्यलोकीच्या कोर्टा-वर पडली म्हणूनच तेथीलही कारभार अलिकडे बिघडू लागला" असावा असे म्हणावे लागेल.

"गरीब बिचारा मानव–मग तो वकील असो, न्यायाधीश असो किंवा आमच्यासारखी कोणी पोटभरू सामान्य इसम असो–आज परिस्थितीनं जर्जर जर्जर झालेला आहे. ना धड पुरेसे अन्न, ना धड पुरेसा निवारा! अशा परिस्थितीत गांजलेल्या मानवानं पैशाच्या आणि सुखसोयींच्या लोभानं जर खऱ्याचं खोटं आणि खोटयाचं खरं केलं; स्वतःच्या दैनंदिन गरजेच्या आहारी जाऊन अम्मळ तो स्वतःला विकला जाऊ लागला, तर त्याला नावे कशी ठेवता येतील? चित्रगुप्त महाराजांसारख्या लौकिकाच्या असामी जर वहीत चक्क खोटया नोंदी करीत असतील आणि महाराज आमची बाजू ऐकून न घेता आम्हाला शिक्षा ठोठावीत असतील तर माझ्यासारख्या क्षुद्र इसमाने पैसे घेऊन आणि मोजून एखादा साक्षीदार फोडला किंवा वीसशेर साखरेच्या लोभाने जर आमच्या शिंगणे कोर्टाने बनावट रेशनकार्ड करणाऱ्या एखाद्या वाण्याला पुराव्याअभावी निरपराध म्हणून सोडून दिलं तर–तर काय हरकत असावी? तुम्ही आणि आम्ही सारखेच अपराधी नाहीत काय? दोन्ही कोर्टे एकाच दर्जाची नाहीत काय?

"Order !" टेबलावरची घंटा ठणकावून यमराज गरजले.

"Sorry your Honour! मी अम्मळ थोडा वाहवला गेलो हे खरं. पण मला आपल्याला नम्रपणे सांगावयाचं आहे की, चित्रगुप्त महाराजांची वही खऱ्या नोंदीच्या अभावी अपुरी आहे. अलिकडे त्यात पापपुण्यांच्या नोंदी नीट साक्षेपाने होत नाहीत असं माझं मत आहे. मर्त्यलोकातील एखादा नवीन पोलिस सब्–इन्स्पेक्टर लहानसहान आरोपांवर खोटेनाटे पंचनामे करून आपली डायरी खटल्यानी जशी भरतो आणि अशानं आपली बढती होईल अशा भ्रमात असतो, त्याच भ्रमात आपले चित्रगुप्त असावेत. सर, माझ्या केसबाबत आपणास त्यांच्या त्या भोंगळ नोंदीवर विसंबून रहाता यावयाचं नाही. मला भीति वाटते सर, तुम्ही दिलेले जजमेंट वर टिकावयाचं नाही. कारण माझ्या पापपुण्याचा पाढा चित्रगुप्ताने वाचला. मी ऐकला. सर आपणही ऐकलात. पण माझ्या जमेला असावयास पाहिजे अशा कितीतरी पुण्यकर्मांची नोंद त्यात अजीबात केली गेलेली नाही. मी फार लांबचं काढीत बसत नाही सर, पण अलिकडची, महाराज त्यात खुद्द आपण स्वतःच साक्षीदार अशी अगदी ताजी पुण्यकर्मेही त्यात आलेली नाहीत. ही काय चित्रगुप्तांची नोंदवही आहे की भिकू वाण्याची खतावणी आहे? ऐकणाराला वाटेल हा धोंडो गुंडो जन्मापासून फक्त पापकर्मेच करीत आला असावा. अहो, मानव-लोकीच नव्हे तर देवलोकीही ज्या पुण्यकर्मांचा आवर्जून आदर व्हावा अशी बहुत सत्कृत्ये आम्ही रोजच्या रोज न चुकता करीत आलेलो आहोत."

या अवचटाच्या भाषणावर चित्रगुप्त कुत्सितपणे खदखदा हसले आणि उठून म्हणाले—"या धोंडो गुंडोची वाणी मोठी अस्ख-लित आणि प्रभावी आहे, यात शंकाच नाही. ठार खोटेही तो मारे सत्याचा आव आणून आत्मविश्वासानं ठोकून देत






आहे. पण हे पाहा त्याचं खातेपान. जमेला एकही पुण्यकर्म नोंदविलेले नाही. अहो नसेलच तर नोंदविलं तरी कोठून जाईल? त्यानं आवाव करून महाराज प्रत्यक्ष आपलाच साक्षीदार म्हणून उल्लेख केलेला आहे. कोर्टाच्या रितीरिवाजाला आणि डिस्प्लिनला सोडून होत असेल तरी चालेल. फार तर नवीन प्रसिडंट पडेल! पडला तर–पडू देत. पण सर, खरोखर याचे काही पुण्यकर्म आपण कधी तरी पाहिलं असेल, कधी ऐकलं असेल तर अवश्य सांगा. त्याची साक्ष द्या."

यमराज बुचकळ्यात पडले. धोंडो गुंडोचा रोख कशावर आहे हे त्याना काहीच समजेना. परंतु ज्याअर्थी इतक्या ठामपणाने हा मानव चित्रगुप्ताविरुद्ध विधाने करतोय् त्याअर्थी त्याचे म्हणणे तरी, काय आहे? हे ऐकण्यासाठी चेअरने धोंडो गुंडोला 'तुमचं म्हणणं पुराव्यानिशी सिद्ध करा' असे सांगितले–"

यावर धोंडो गुंडो म्हणाला, "युवर ऑनर, मानवधर्म कोडच्या आर्यावर्त खंडातील ॲक्ट नं. ४९० कलम नं. पाच पोट कलम अ मध्ये असं सांगितलं आहे की, अन्नदानासारखं महत् पुण्य नाही. जो अतिथीधर्माला जागतो तो पुण्यात्मा मुक्त होय, असं त्यात म्हटलेलं आहे. मौजे अवसरी खुर्द येथील या धोंडो गुंडोने रोज नियमितपणे वैश्वदेवानंतर काकबली टाकताना अतिथीची अगत्यपूर्वक चौकशी केलेली आहे आणि दारी आलेल्या अभ्यागताला पोटभर जेऊ घातलेलं आहे याची नोंद माझ्या खाती जमा झालेली दिसत नाही...




...सर, आपण ज्यावेळी माझ्यावरचं चार्जशीट वाचून दाखविलंत त्यावेळी यमदूतांचं चार दिवस आतिथ्य करून त्याना मी गुंतवून ठेवलं अशी तक्रार नोंदली गेलेली आहे..."

यावर तुम्हाला काय म्हणायचंय्? यमराजाने चित्रगुप्ताकडे कटाक्ष टाकताच चित्रगुप्त पुढे म्हणाले, 'युवर ऑनर, अवचटानं पुराव्यादाखल केलेले हे विधान अर्धसत्य असल्यामुळे, आणि या त्याच्या कृत्याला त्याच्या अर्धांगीची खुशीची परवानगी नसल्यामुळे त्याची नोंद आमच्या वहीत होऊ शकली नाही....'

"म्हणजे काय? स्पष्टीकरण करा" यमराजाने आज्ञाविले.

म्हणजे महाराज असे की, 'अतिथीची चौकशी करताना, हा ब्राह्मण, शपयेला मोकळं व्हावं अशा बेतानं ती करी..फारसं कुणाला ऐकू जाणार नाही अशा आवाजानं तोंडातल्या तोंडात 'कोणी अतिथी अभ्यागत आहे काय?' अशी पुटपुट करून काकबली टाकतो कधी आणि लगेच घरात जातोय् कधी असं हा ब्राह्मण करीत असे. मनापासून कोणी अतिथी यावा आणि त्याला अन्नदान घडावं असं याला वाटत नसे. शिवाय याची भार्या–सौ. गंगाबाई अवचट....

मध्येच या नावाला कोर्टाने हरकत घेतली.

पण चित्रगुप्ताने खुलासा केला की, आवडाबाईचे सासरचे नांव सौ. गंगाबाई असेच असून कागदपत्रांवर तेच लागलेले आहे.

...तर ही गंगाबाई, याच्या या अतिथी बोलावण्याच्या कृत्यावर नाराज असे. कपाळाला आठ्या घालून ती स्वयंपाक ऐन वेळी वाढवी आणि आदळ आपट करून ती वाढप करी. ब्राह्मण कुळात जन्म घेऊन गृहस्थाश्रमाचे पालन करीत असता या पतिपत्नीनी कधीही हसतमुखानी अन्नदानाचे यजमान कृत्य केलेलं नाही." चित्रगुप्त थांबले. तोच "खोटं, साफ खोटं; धादांत खोटा बनाव करून... हे सांगितलं जातंय्..." अवचट एकदम ओरडला.

Order ! Order !!

माफीची याचना करून चित्रगुप्ताच्या म्हणण्याला हरकत घेण्यासाठी अवचट पुढे आला आणि रेडी रेफरन्स म्हणून अवसरीला आलेल्या यमदूताना कोर्टापुढे आणावं अशी त्याने कोर्टाला विनंती केली.

यमदूतांनी साक्ष देताना माहिती सादर केली की, 'वॉरंट बजवावयास अवसरीला गेलो असताना या गृहस्थाने मोठ्या अगत्याने आमचे स्वागत केले. वॉरंटाची वेळ चुकली आहे, नवे वॉरंट इश्यू केल्याशिवाय अवचटाचा मुद्दा या दरबारात हजर करता येत नाही असे नक्की झाल्यावर आम्ही या अवसरीकराच्या घरचा पाहुणचार मनसोक्त घेतला, हे आम्हास मोठ्या शरमेने कबूल करणे प्राप्त आहे. पिठल्याचे निरनिराळे प्रकार–झालेच तर श्रीखंड, बासुंदी, वगैरे पक्वान्नं आम्ही आमच्या उदरात आकंठ रिचवली. महाराज, बोलण्याची माफी असावी, पण पृथ्वीवरचे चहा नामे अमृत तर आम्ही सकाळ संध्याकाळ सारखे ढोशीत होतो...'यमदूताच्या तोंडाला त्या साऱ्या आठवणींमुळे पाणीच पाणी सुटल्यामुळे तो अवाक् तर झालाच..पण...शिवाय...

"बस्स्, बस्स! पुरे झालं तुमच्या त्या खादाडपणाचं पांचट रसवर्णन"... कोर्टाच्या या गर्जनेमुळे साक्षीसाठी पुढे आलेले यमदूत हात बांधून आणि मुखावर लाचारीची छटा कायम ठेवून पाठीमागे सरकत सरकत निघून गेले.

चित्रगुप्ताच्या वहीत धोंडो गुंडोच्या या सत्कृत्याची अर्थातच् नोंद नव्हती. तरीही त्याने लंगडे समर्थन देण्याचा प्रयत्न केला. बचावाच्या संदर्भात चित्रगुप्त म्हणाले:

"यमदूतांचे तसे स्वागत करताना खरं म्हणजे अवचटाच्या पोटात कपट होतं. वॉरंट टाळण्यासाठी लाच म्हणून त्यानं यमदूताचा पाहुणचार केला आणि त्यामुळे अर्थातच ते पुण्यकर्म होऊ शकत नाही असं माझं मत आहे."

यावर तात्काळ धोंडो गुंडो ताडकन् म्हणाला, "सर, ब्राह्मण स्वरुपात आलेले अतिथी वास्तविक यमदूत आहेत हे मला त्यांचं जेवण संपत-आल्यावर समजलेले आहे आणि समजल्यावरही मी त्या पाहुण्यांशी विश्वासघात न करता सज्जन गृहस्थाप्रमाणे पुढेही त्यांचा चार दिवस प्रतिपाळ केलेला आहे. प्रत्यक्ष शत्रूलाही आश्रय देताना मी उत्तम प्रकारचा गृहस्थधर्म पाळून फार मोठे पुण्य पदरी जोडलेलं आहे असं माझं मत आहे. चित्रगुप्तांच्या वहीत अलिकडे गोंधळ आणि अंदाधुंदी सुरू झालेली आहे, या माझ्या सुरवातीच्या स्टेटमेंटशी—सर, आपण सहमत व्हाल आणि मला न्याय द्याल अशी माझी खात्री आहे."

यमराजांचं ध्यान जरा हेलावलय् असं पाहून धोंडो गुंडो गयावया करून पुढे म्हणाला, "यमराज, शीतावरून भाताची परीक्षा करा आणि चित्रगुप्ताचा पुरावा अपुरा आहे हे ध्यानी घेऊन माझ्यासारख्या निरपराध जीवाला आता मुक्त करा. माझी शिक्षा रद्द करा. मी बापडा लगेच अवसरीला जाईन. माझी आवडी बिचारी आर्य पतिव्रता आहे. तिने खालती आकांत मांडला असेल. दुःखातीरेकाने बिचारीचे एखादे वेळी बरेवाईट सुद्धा होईल. आमचे भाऊबंद तिकडे आमच्या उत्तरक्रियेची घाई करतील आणि नाना तऱ्हेचे गोंधळ करून ठेवतील."

धोंडो गुंडोने एक आवंढा गिळला आणि तो पुढे म्हणाला—"मी सकाळपासून उपासपोटी आहे. अरे हो, महाराज आपल्याला तर माहीतच आहे ते! मला तूर्त काही चहा वगैरे मिळाला तर मी आपला फार फार आभारी होईन. आणि Order होताच मी खाली अवसरीला जाईन आणि सकाळची पिठलं दशमी खाईन.."

विचारात गढून गेलेले यमराज यावर म्हणाले, "अवसरीकर, तुमच्यावर थोडा अन्याय झाला आहे, हे मला मान्य असलं तरी तुमची शिक्षा सर्वस्वी रद्दबातल करता येईल असं मला वाटत नाही. एकतर आता हा या कोर्टाच्या प्रेस्टिजचा प्रश्न आहे आणि दुसरं असं की, येथे आणला गेलेला मुडदा परत पाठवून देणं हे या कोर्टाच्या मुखत्यारीतलं काम नाही. वास्तविक काही दिवसापूर्वीच तुम्ही येथे ड्यू होतात. कैलास कोर्टात काही-तरी दिरंगाई झाली आणि तुम्हाला टाईम मिळाला. अलिकडे तुम्हाला जे हे एक्स्टेन्शन मिळालं ते तुमच्या जमा होण्याच्या राहून गेलेल्या पुण्याईमुळंच मिळालं असं समजा. मी माझ्या मुखत्यारीत तुम्हाला जेवढा रीलिफ देता येईल तेवढा देतो. फार तर अजून सुमारे एक घटकाभर तुम्हाला तुमचं आयुष्य परत मिळेल. उरलेल्या तुमच्या या तीन साडेतीन तासांच्या कालावधीत तुम्हाला मी मुक्त करून स्वातंत्र्य देत आहे. तुम्ही स्वर्गात मनमानेल तसा संचार करा. चहा वगैरेचं सोडाच पण थोडं काही अमृत सेवन करा."

"तुमच्या चाणाक्षपणावर आणि कोर्टकचेरीच्या कामाच्या अनुभवावर मी संतुष्ट झाल्यामुळं मी तुम्हाला काही हो ना प्रवास-भत्ता म्हणून मंजूर करतो. वर तुमच्या वाहनाची सोयहि करतो. स्वर्गातली कामधेनू तुमच्या दिमतीस दिली जाईल. ती तुम्हाला स्वर्गभर फिरवील. आणि बरोबर पांच वाजता येथे परत आणून हजर करील. पुन्हा तुम्हाला मुडद्याच्या स्वरूपात यमदूतांच्या स्वाधीन व्हावे लागेल आणि विनतक्रार नरकाची वाट चालू लागावी लागेल. तुमची शिक्षा मी बरीच कमी केलेली आहे. पन्नासवरून मी ती फक्त पाच वर्षे नरकवासावर आणलेली आहे.

या निर्वाणीच्या निर्णयाविरुद्ध लगेच वाद घालून काही उपयोग नाही. मिळालेली सवलतच सही. पुढं बुद्धी चालेल त्याप्रमाणे काय ते करावं. आणि कोर्टाची तूर्तास झालेली ऑर्डर पदरात पाडून घ्यावी असे ठरवून धोंडो गुंडोने कोर्टाने दाखविलेल्या दर्याद्र बुद्धीबद्दल यमराजांचे आभार मानले. त्याना पुन्हा पुन्हा वाकवाकून नमस्कार केला. चित्रगुप्तालाही त्यानी एकवार मान-भावीपणाने नमस्कार केला आणि तो पुढील व्यवस्थेची वाट पाहू लागला.

कोर्टाची ऑर्डर टाईप होत होती तोपर्यंत कामधेनूला बोलावणे गेले. कामधेनू दरवाजात प्राप्त होताच, यमराज तिला सांगते झाले की, "आदिमाये, तीन तासासाठी मी तुला या मानवाच्या सेवेला रुजू करीत आहे. नरकवासापूर्वीची त्याला मिळालेली ही सवलत त्याला मनमुराद उपभोगू दे. तुझा या क्षणापासून पाच वाजे-



बरं का, देशाला काटकसरीची फार जरुरी आहे म्हणून ही नवी लहान गाडी माझ्यासाठी आणलीय – तुम्ही आता मोठ्या गाड्या वापरा...



अनुक्रमणिका

पर्यंतचा संचार अर्थात् स्वर्गातल्या स्वर्गातच–त्याच्या इच्छेप्रमाणे होऊ दे. इतकं बजावण्याचं कारण इतकंच की, हा मानव गोड-बोल्या आणि अवलाद आहे. आगाऊपणा करील आणि तुला एखादे वेळी अवसरीला नेईल आणि मग सारा घोटाळा होऊन बसेल. बरोबर पाच वाजता तू त्याला येथे परत घेऊन ये. उशीर करू नकोस. इथलं काम आटोपल्यावर मला लगेच महाली गेलं पाहिजे. तसं मी यमराज्ञीला कबूल केलं आहे.

शेवटच्या या खाजगी बाबीचा उल्लेख तोंडावाहेर पडताच यमराज थोडे लाजले. पण होऊ नये तो उल्लेख बोलण्याच्या भरात होऊन गेला होता. त्याच मूडमध्ये त्याना धोंडो गुंडोला आवडीच्या भेटीची ओढ कां लागली असावी आणि जीवदानाची याचना करताना विचारा 'आवडीला दिलेला शब्द मला पाळू द्या' असे कां म्हणाला, याचा उलगडा झाला. समदुःखीताच्या भाव-नेची समरसता त्याना जाणवली. आणि त्यांचे त्यानाच हसू आले. मात्र ते आपले अम्मळ गालातल्या गालातच हसले.

कामधेनूने एकवार अवचटाकडे आपादमस्तक पाहून घेतले. पाहता पाहता कामधेनूची नजर समाधान पावली. कामधेनूच्या अंतर्यामीच्या या समाधानाबाबतचे खाजगी कारण अर्थातच दरबारातील इतर मंडळीना समजण्यासारखे नव्हते. कामधेनूलाच राहवले नाही म्हणून ती यमराजांकडे पाहत उद्गारली—

रेडेश्वरा, मी आपल्या आज्ञेप्रमाणे याची–हा मानव असला तरी–मनोभावे सेवा करीन. कारण याचे माझ्यावर अप्रत्यक्ष उपकार झालेले आहेत. याच्या घरी उरलेले अन्न नेहमी गाई-वासरांच्या मुखी पडलेले आहे. त्यामुळे माझ्या पृथ्वीवरील जात-बांधवांवर झालेले याचे परोपकार माझ्या पावेतो रुजू झालेले आहेत—

या विधानाबरोबर दरबारात ही नजरानजरी झाली !

यमराजाच्या नजरेत चित्रगुप्ताला प्रश्न होता–या पुण्यकर्माची नोंद तरी तुझ्या वहीत आहे काय?

चित्रगुप्ताच्या नजरेत होतं—च्यायला! या बोचक भवानीनं इथं येऊन अशा वेळी हा आगावूपणा कशाला केला? आता हा रेडेश्वर आपल्याला आणखी वाजवणार की काय ?

आणि धोंडो गुंडोच्या नजरेत होतं–'जितं मया!' त्याला टाईम असता तर तो म्हणाला असता–"घ्या लेको, घ्या ! माझ्या पुण्य-कर्माचा आणखी एक पुरावा घ्या !" पण तो वेळ दवडण्याच्या फंदात पडला नाही. त्याने खंड्यावर टाकावी तशी कपिलेवर टांग टाकली आणि शिंगाना धरून त्यानं तिला दरबाराबाहेर हाकारले. अर्थात कपिलेवर स्वार होण्यापूर्वी तिच्या पंचकल्याणी मस्तकाचे दर्शन घ्यावयास तो चुकला नाही.

स्वतःच्या दिमतीला मिळालेल्या कामधेनूला अवचटाने पहिली आज्ञा दिली ती अशी की, 'कपिले, चल–ब्रह्मदेवाच्या महाली चल'. ब्रह्मदेवाच्या महालाच्या प्रांगणात कपिला पोहोचली तेव्हा तिथं सर्वत्र अर्धी कच्ची मडकी पडली होती.

मडकी कशी घडवली जात आहेत ? आणि ती इतकी का घडली जात आहेत? याची वास्तविक ब्रह्मदेवानं जातीने काळजी घ्यावी असा संकेत होता पण ब्रह्मदेव अजून दुपारच्या वामकुक्षीतच गुरफटून पडलेले होते. खरे तर सगळा माल खाली डिस्पॅच होण्यापूर्वी ब्रह्मदेवाने खुद्द स्वतः तो टिचकी मारून टेस्ट करून पहावा, घडाई पक्की झाली असेल तरच तो अॅप्रुव्हड् करून पृथ्वीवर धाडला जावा असा शिरस्ता होता. पण या कायद्याचे पालन ढिले झालेले दिसत होते. ब्रह्मदेव हे काम कोणा दुय्यम तिय्यम अधिकाऱ्यावर सोपवून खुशाल घोरत पडले होते. आणि इकडे पृथ्वीवर हवी तशी वाटेल तितकी पैदास होत होती. या लोकसंख्येच्या वाढीला काही सुमार राहिला नव्हता. सारी वाढ भूमितीच्या वाढीने होत होती.

"कपिले, तो गेंदी मंचकावर लोळत आहे तोवरच त्याच्या ढेरीत तुझे एक शिंग खुपस आणि त्याला शिंगावर घे. आणि लगेच पुढे त्या मृत्युंजयाच्या गढीवर चल."

कपिला क्षणभर बावरली. पण तिचा काही इलाज चालणार नव्हता. धोंडो गुंडोचा हुकूम पार पाडणे हे तिला क्रमप्राप्तच होते. नाहीपेक्षा खंड्याला बसे तशी टाच तिला बसली असती.

शंकराच्या मठीवर ही वरात येऊन पोहोचली. त्यावेळी नुक-तीच निद्रा संपवून महादेवाने गांजाची चिलीम भरलेली होती, दोनचार झुरके चढवून झाले होते. स्वारी नशेत पोहोचण्यापूर्वीची अवस्था होती. किलकिल्या डोळ्याने दम भरीत होती.

धुनी लगतच्या चेंबरमध्ये मृत्यूखात्यातले दोन अधिकारी वारंटाचे लिफाफे घेऊन ताटकळत बसलेले होते; कितीतरी वॉरंटा-वर सही शिक्क्यांचे मोर्तब व्हावयाचे राहून गेले होते. गांज्याच्या वाढत्या व्यसनापाई आणि नृत्यांगनांच्या चढत्या नाचरंगापाई शिवशंभोचा बराचसा टाईम नशा करमणुकीत जाई. उरलेला झोपेत व्यतीत होई. हाताखालच्या अधिकाऱ्याना भीतभीतच का होईना टुमणे लावावे तरच पार्वतिपती कधीतरी कामाला बसत आणि मानव संहाराच्या वॉरंटावर आपली मुद्रा करीत. काम चाले तेही नशेच्या कैफात !

कपिलेचा थयथयाट, ब्रह्मदेवाचे बोंबलणे, आणि अवचटाचे कपिलेने दौडावे म्हणून केलेले च्यक् च्यक् वगैरे ऐकून शिवाने अम्मळ आपले डोळे उघडले आणि काय प्रकार आहे ते पाहून घेतले.

पूर्व नोटीस नसताना मानवधारी कपिला एका शिंगावर ब्रह्मदेवाला टांगून घेऊन आपल्याकडे कां बरे आली असावी ? हा विचार कुठं त्याच्या डोक्यात शिरतो न शिरतो तोच कपिलेने त्यांच्या कुशीत आपले दुसरे शिंग खुपसले आणि अवचटाच्या आज्ञे-बरहुकूम ती तेथून बाहेर पडली. शंकराला तिसरा नयन उघडायला फुरसदही मिळाली नाही.

अवचटानं आपला मोर्चा आता स्वर्गातील प्रिव्ही कौन्सिलकडे वळविला.

यमदरबारातून निघाल्यापासून, कपिला आणि तिच्यावरचा मानव यांचा स्वर्गसंचार पाहण्यासाठी त्यांच्या मागे यक्ष, किन्नर,

अनुक्रमणिका



BENSONS2/NGB-101B MAR

# तिचा लग्न समारंभ आम्ही आनंदानें पार पाडला

खरोखरच आम्हाला पुष्कळ आनंद झाला. आम्हाला कल्पना नव्हती कीं आम्ही एवढ्या कमी उत्पन्नांत सीतेचं लग्न इतक्या थाटामाटांत करूं शकूं.

ह्या गोष्टीला पुष्कळ वर्षें झाली. आतां आम्हाला आठवत सुद्धा नाहीं कीं नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज बँकमध्यें थोडें पैसें बचत करण्याची सल्ला कोणी दिला. आणि आम्हाला सांगण्यांत जरा पण संकोच वाटत नाही कीं बँकेत पाऊल ठेवण्याची पण आमची हिंमत नव्हती आम्हाला वाटत होते कीं नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज ही मोठ्या माणसांची मोठी बँक आहे.



वाटत होते, आम्हाला ते हसतील काय ? एवढी लहान रक्कम ते स्वीकारतील काय ? परंतु तुम्हाला आश्चर्य वाटेल.

"त्यांनी सांगितले तुम्ही पांच रुपयांनी सुरुवात केली तरी आम्हाला आनंदच होईल" आणि खरोखरचं त्यांच्याकडें सेव्हिंग्स बँक अकाउंट उघडण्याकरितां फक्त तितक्याचीच आवश्यकता आहे. आणि एवढेंच नव्हे तर प्रत्येक वर्षी ४% व्याज मिळून तुमचे पैसे वाढत असतात फक्त आपल्याला बँकेत गेले पाहिजे. योग्य ती सेवा देण्यांस ते तत्पर आहेत एवढ्यानेंच जर कोणती बँक चांगली समजली जात असेल तर ते सर्व इथें आढळेल. नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज मध्यें या आणि स्वतः अनुभवा.

*तुम्ही आणि नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज खरोखरचें मित्र होऊं शकतां*

## नॅशनल अन्ड ग्रिन्डलेज बँक लिमिटेड

संयुक्त राज्यांत संस्थापित ० सभासदांची मर्यादित ० ॲसोशिएटेड बँक्स : लॉयड्स बँक लिमिटेड ० नॅशनल.प्रॉव्हिन्शियल बँक लिमिटेड

**मुंबईतील शाखा** :—९०, महात्मा गांधी रोड, २७०/२७२, डॉ. दादाभाई नवरोजी रोड, (लाइडस ब्रँच) ; मिंट रोड, (मिंट रोड आणि सर फिरोजशाह मेहेता रोडच्या कोपऱ्यावर) ; २१/२९, प्रिन्सेस स्ट्रीट, (लाइडस ब्रँच) ; ११७/११९, काझि सैयद स्ट्रीट, मांडवी ; ६५एफ, लिंकिंग रोड, सान्ता क्रुझ : ५७४, गोआलिया टँक रोड, [illegible] हिल ; शिवाजी मंदिर, न. चि. केळकर रोड, दादर, (सेफ डिपॉझिट लॉकर्स) ; २४बि, [illegible], [illegible]. **ठाणें** :—आग्रा रोड, कोलबाद रोड, (कॅसल मिल्सच्या जवळ).

अनुक्रमणिका





देवदूत, अप्सरा यांची गर्दी जमली होती. सारे स्तंभित होऊन पाहत होते. ब्रह्मदेवाच्या जोडीला शिवशंकर आल्यावर तर गर्दीला सुमारच राहिला नाही. गर्दी शिगेला पोहोचली. गर्दीतून वाट काढताना कपिलेचा वेगही मंदावला होता. सकाळपासून उपासपोटी असलेल्या अवचटाच्या घशाला कोरड पडली होती. त्याला विलक्षण थकवा आला होता. त्याने कपिलेला अम्मळ एका अमृतबारपुढे उभी केली. एक नौटाक मागविला आणि तो ढसाढसा अमृत प्याला. परंतु त्याची तहान काही भागली नाही. त्याला खरोखर चहाचीच तल्लफ आलेली होती. अलिकडे असे एकदम घाबरे घाबरे व्हावयास लागले की, ते कां होते हे दोन अनुभवांवरून त्याच्या लक्षात आले होते. म्हणून त्याने घाबरून खिशातले घड्याळ बघितले. काळ्या गोफाला लावलेल्या त्या रेल्वे इंजिन छापे घड्याळात पावणे पाच झाले होते. वेळ भरत आली होती. अवघ्या पंधरा मिनिटांचा खेळ उरला होता. पल्ला तर लांबचा गाठावयाचा होता. विष्णूमंदिर अजून चांगले योजनभर दूर होते आणि वाटेतल्या बघ्यांच्या गर्दीमुळे कपिला वेग घेऊ शकत नव्हती.

धोंडो गुंडोला आता कपिलेची गय करणे मुळीच शक्य नव्हते. त्याने कपिलेला इच्छा नसताना टाच मारली. टाचेचा इशारा मिळताच कपिला भरधाव निघाली. विष्णूमंदिरात ती पोहोचली त्यावेळी पाचाला अवघी सात मिनिटे उरली होती.

अवचट पोहोचण्याच्या अगोदर भगवान विष्णूंच्या कौन्सिल हॉलमध्ये भरपूर गर्दी झालेली होती. यमराज भीतीने चळचळ कापत एका पायावर उभे होते. त्यानी दिलेल्या सवलतीचा दुरुपयोग झाला होता. अवचटाने स्वर्गातले दोन मंत्री लटकावून टाकले होते. आपल्या अदूरदृष्टीमुळे हे घडले. आता देवाधिदेव आपल्याला कॅबिनेटमधून डिसमेंबर करतील, एवढेच नव्हे तर दरबारातले आपले सभासदत्वही एखाद वेळी नष्ट होईल अशी भीति यमाला पडली. चित्रगुप्त यमराजांची दशा पाहून मनात अम्मळ संतोषला असला तरी एकूण तो गर्भगळीत झालेलाच दिसत होता. यमी; तसेच ब्रह्मदेवाचे नातेवाईक काय होणार या काळजीने व्यथित होऊन विष्णूकडे पातले होते.



"–मग, पाणीच तेवढं अमेरिकेहून कां आणत नाहीत कुणास ठाऊक !"

झाल्या प्रकाराची एक बाजू कानावर आल्यामुळे भगवान चक्करमध्ये सापडलेले भासत असले तरी ते सिंहासनावर क्रोधायमान झालेले दिसत होते. त्यांचा चक्रपाणी ताठारलेला होता.

पण 'कम् व्हाट मे' या निर्धाराने त्यानी एकवार हॉलभर धीरगंभीर नजरेने पाहून घेतले आणि कपिलेला गर्जून विचारले,

"आदिमाये, हा काय धिंगाणा मांडला आहेस? मला कळू द्या हा काय प्रकार आहे तो!"

देवांचा बोलण्याचा रोख लेकी बोले सुने लागे या थाटाचा आहे हे लक्षात घेऊन आणि घड्याळात आता केवळ चार साडेचार मिनिटांचाच काय तो अवधी उरला आहे हे हेरून धोंडो गुंडो अनुज्ञेची वाट न पाहता एकदम म्हणाला—

"मि लॉर्ड! युवर ऑनर—"

"ऑर्डर! ऑर्डर!!" अपिलेट कोर्टाचा हा घनगंभीर आवाज ऐकून गरुडाचे पंख फडफडले. सारा दरबार एकवार दचकला. पण धोंडो गुंडो जरासुद्धा विचलित न होता चिवटपणे पुढे म्हणाला—

"देवाधिदेवा, क्षमा असावी. माझं बोलणं वागणं काही चुकलं असेल तर मला क्षमा करा महाराज. मी अज्ञानी मानव. मला या कोर्टातले एटिकेट्स कोठून माहित असणार? मी मर्त्यलोकातील मानव रीतिरिवाजापेक्षा वेळेला महत्त्व देणारा म्हणून मी आपल्याकडे तातडीचे अपील फाईल करायला आलो आहे. शिवाय स्वर्गातल्या या दोन जबाबदार–जबाबदार कसल्या–बेजबाबदार मंत्र्यांविरुद्ध माझा एक तक्रार अर्ज मला आपल्यापुढे नोंदवावयाचा आहे. अखिल मानव जातीच्या वतीने तिचा प्रतिनिधि म्हणून मी हा अर्ज नोंदवीत आहे. माझा आपला तर्क असा की, कॅबिनेटमधील मंत्र्याविरुद्ध काही फिर्याद दाखल करावयाची असेल तर ती एकदम या आपल्या कोर्टातच नोंदवावी लागेल. आणि म्हणून सर, मी डायरेक्ट येथे आलो आहे. माय, लॉर्ड, परवानगी असावी. वेळ अगदी थोडा राहिलाय्. अलावू करत असाल तर माझी दोन्ही कामं मी आपल्यापुढं पेश करीन."

"हे उद्धट मानवा, रिपोर्ट केला गेला आहेस त्यापेक्षाही तू अधिक बेडर आहेस—" अपिलेट कोर्ट उद्गारले.

उद्धट आणि बेडर हे शब्द कानी पडताच धोंडो गुंडो मध्येच म्हणाला, "प्रभो, एक गोष्ट मी आपणास प्रथमच नम्रपणाने पण तितक्याच ठामपणाने ऐकवू इच्छितो, ती ही की, हा धोंडो गुंडो सत्य गोष्टीचा शहानिशा करण्यासाठी, कुणाला आणि कधीही भेटावयास म्याला–कचरला नाही. आणि दुसरे असे की, काही कारणास्तव म्यालोय् म्हणून कुणालाच कधी घाबरून भेटला नाही. तेव्हा मी जो इथं आलोय्....."

"अहंकारी आणि गर्विष्ठ पामरा, समजली तुझी अक्कल! तुझ्यासाठी नाही, परंतु या कौन्सिलच्या प्रतिष्ठेच्या परंपरेसाठी मी तुझ्या दोन्ही फिर्यादी बोर्डावर आलाव् करून घेऊन तुला त्या सादर करण्यास पर्मिशन देत आहे. काय सांगावयाचं असेल ते लवकर सांग. माझी विश्रांतीची वेळ झाली आहे.

अनुक्रमणिका

शेषराज पुष्पवटिकेत येऊन त्यानी कधीचीच माझी शय्या अॅरेंज केली असेल. आणि देवी लक्ष्मीहि तिकडे माझे पाय चुरण्यासाठी म्हणून ताटकळत बसली असेल."

"हेच! महाराज हेच चाललंय्! अलिकडे तुमच्या या स्वर्गांत झोपा, व्यसनं, ऐषाराम यापायीच येथला साराच कारभार ढिला झालाय्. इतका ढिला आणि अनागोंदीचा झालाय् की त्याची झळ आम्हा मृत्युलोकवासियाना लागू लागली आहे."

Order ! Order !! भगवान विष्णूनी आपली हातोडी टेबलावर आपटली. शांतता प्रस्थापित झालेली पाहून ते पुढे म्हणाले, "तुझी अवांतर वटवट एकदम बंद कर आणि प्रथम निळकंठ आणि ब्रह्मदेव याना मुक्त कर आणि मग पॉईंटशीर तुला काय गुन्हाळ गाळायचय् ते गाळ.

"देवा, त्यांच्या स्वतःच्या कृत्यामुळेच ते ही शिक्षा भोगीत आहेत. हे सारे मायाजाल तुमचेच आहे. मानवानं देवाना शिक्षा करावी इतका आणि अशा प्रकारचा कायदा आम्ही मानवानं अजून हाती घेतलेला नाही. पृथ्वीखंडावरील ज्या राष्ट्राचा मी नागरिक आहे ते अम्मळ व्यक्तीपूजक असले तरी ते एक लोकशाही राष्ट्र आहे. लष्करी अंदाधुंदी किंवा कम्युनिस्ट तंत्र यांच्यापासून अजून आम्ही दूर आहोत. देवाधर्माची चाड अजून आम्हाला आहे. आम्हीहून तुम्हाला दिलेलं देवपण अजून आम्ही मानीत आहोत. सारे धार्मिक ग्रंथ आणि पुराण आम्ही अजून शिरोधार्य मानन आहोत. पण मला भीति वाटते महाराज, तुमच्या या असल्या कृत्यांमुळे मात्र कदाचित् आम्हाला देव आणि धर्म या कल्पनांचा फेरविचार करावा लागेल. तुमची थेरं अशीच चालली तर तुम्हाला दिलेलं देवपण आम्हाला मागं पुढं रद्दबातल करावं लागेल. देवा, तुम्हाला तुमचे सहकारी असे लटकून राहिलेले पाहवत नसतील तर आणि खटला सुरू होण्यापूर्वी त्याना बेलवर सोडावयाचे असेल तर तुम्ही तुमच्या अधिकारात त्याना जरूर मुक्त करू शकता. मी कोण त्याना मुक्त करणार? मी हवं तर रिमांड मागत नाही. आता लगेच खटला चालवितो."

घड्याळात पाच वाजायला काही सेकंदांचाच अवधि होता. विष्णूने आपला एक हात आशीर्वादात्मकरित्या वर केला आणि उःशापाचे काही शब्द तोंडातल्या तोंडात पुटपुटले. त्यासरशी दोन्ही मंत्री लटकल्याचे उभे झाले. आणि इकडे घड्याळात खर्ररर्र होऊन पांचपैकी एक टोला वाजताच कपिला गरंकन् वळली—

पण अवचट सावध होता. आपला सारा जोर जोपर्यंत आपण कपिलेवर आरुढ आहोत तोवरच आहे याचे त्याला सतत भान होते. त्यामुळे—

कपिला वळतेय् तोच धोंडो गुंडोने तात्काळ कपिलेवरून जी खाली उडी घेतली ती नेमकी विष्णूचरणी. अवचट विष्णूपदी दोन्ही पदकमले आपल्या कपाळाशी घट्ट धरून साष्टांग पालथा पडला, त्यावेळी पांचातील तीन टोले पडून झाले होते.

अकस्मात् घडलेला हा ट्रान्स्फर सीन पाहून भगवान विष्णूही थोडे बावरले. आपल्या चरणी पडलेल्या कोणालाही "ऊठ, ऊठ तुला अभय आहे असे घाईघाईने वदण्याच्या नित्य खोडीप्रमाणे त्याने ऊठ ऊठ अवसरीकर, तुला अभय दिले आहे असे अनावधानाने म्हटले. आणि अवचट पुन्हा नव्या अवसानाने ताठ उभा राहिला.

अवसरीकर बेंचपुढे कैफियत मांडू लागला त्यावेळी पांच वाजून दहा सेकंद झाले होते.

अवचटाने चित्रगुप्ताच्या वहीबद्दलचा सारा पंचनामा विस्ताराने कथन केला आणि यमराजाने कमी करून दिलेली शिक्षाही किती जबर व अन्याय्य आहे हे त्याने मोठ्या अपीलिंग भाषेत कोर्टापुढे मांडले. तो म्हणाला, देवा, माझ्यासारख्या झाल्या सवरल्या माणसाला मृत्यूचे भय मुळीच नाही. खरं तर मी मृत्यूची कधीपासूनचीच वाट पहात आहे. पण हरेश्वराच्या ऑफिसमधल्या दिरंगाईमुळं एकदा आणि यमदूतांच्या खाबूपणामुळं दुसऱ्यांदा फिरून फिरून मला कसं जीवदान मिळालं त्याचं रसभरीत वर्णन त्यानं दरबाराला ऐकवलं. मृत्यु हवा असून तो आला नाही तर मानवाला काय यमयातना होतात हे पटवून देताना त्याने सांगितले, "देवा, मिळालेलं उत्तर आयुष्य हे वरदान नसून केवळ तो एक शापच असतो. तेव्हा, देवा माझा झालेला मृत्यु कायमच असावा. पण मृत्यूनंतरची माझी गति मात्र नरकवासात नसावी, असं मला वाटतं. तरी माझ्या मृत्यूनंतरच्या वास्तव्य स्थानाबाबत आपणाकडून फेरविचार व्हावयास पाहिजे. मला स्वर्गवासच



**अजिबात नो !**

**स्टेनो सांगे बॉसला**
**गडे जाऊ या एरॉसला**
**साहेब दावी खाली खिसा**
**स्टेनोला आला भलता घुस्सा.**
**साहेब लावी लाडीगोडी**
**स्टेनो, कानांवर झुलपं ओढी!**
**(साहेबानं नेलं तोंड जवळ)**
**'अजि बात तो सुनो'**
**(स्टेनोचा हात ओठांजवळ)**
**'अजिबात नो!'**

—सुमन वर्वे

आणि तोही दीर्घ काळ मिळाला पाहिजे. मी अनेक कायद्यांच्या विविध कलमानी कोर्टाला ते पटवून देऊ शकेन."

'परमेश्वरा, आपण सर्वसाक्षी आहात, सर्व मानव–कोड, झालंच तर सर्व स्वर्गीय यच्चयावत अॅक्ट, रेडीरेफरन्ससारखे देवा, आपल्या जिव्हाग्री तयार असतील याची मला खात्री आहे. शिवाय मि लॉर्ड, विष्णु स्तुति आणि तन्निमित्त फले या अॅक्टबाबत आपली विशेष स्पेशॅलिटी आहे असं मी ऐकून असलो तरीही त्यातील कलम नं. २९ कडे मी कोर्टाचं लक्ष वेधू इच्छितो. त्या कलमान्वये मला माझ्या अपिलाच्या कामात भरपूर सवलत मिळण्यासारखी आहे. तशी मिळावी अशी नम्र विनंती आहे. या कलमाची मुद्दाम आणि आवर्जून आठवण करून देण्याचं प्रयोजन यासाठीच की देवा, तिकडे देवी लक्ष्मी ताटकळत बसल्या असतील या जाणीवेने घाई गर्दी होऊन या कलमाचं विस्मरण ऐनवेळी होऊ नये व या पामरावर अन्याय होऊ नये. हीच आपल्या चरणी अखेरची प्रार्थना !"

''ऑर्डर! ऑर्डर!! असा वैयक्तिक उल्लेख करून तू या कोर्टाचा किती अवमान करीत आहेस, याचे तुला काही भान उरले आहे काय? मानवा तू शुद्धीवर आहेस काय?" विष्णूने अवसरीकराला चापले.

"महाराज, चुकीची माफी असावी. भूतलावरील माझा अनुभव जमेस धरून हा उच्चार माझ्याकडून झाला. क्षमा करावी. आमच्याकडे जर कोर्टाला शुद्धीवर आणावयाचं असेल तर अलिकडे अशीच काही खुबी करावी लागते. येथे–या स्वर्गीय कोर्टात–जर अशा काही खुब्यांची जरुरी नसेल तर मी खुलासा करू इच्छितो की, कोर्टासंबंधी केलेला वैयक्तिक उल्लेख मी केवळ अप्रबुद्ध बुद्धीने केला आहे तो उल्लेख मी मागे घेतो. आणि म्हणून तो टेक्स्टमधून गाळावा अशी माझी विनंती आहे."

शिरस्तेदाराने कलम चालविले आणि लक्ष्मीनारायणासंबंधी आलेला रेफरन्स रद्द समजून खोडून टाकला.

या ओमिशनमुळे भगवान विष्णू चित्तात अम्मळ समाधान पावले आणि सर्वांना ते तात्काळ दिसोनही आले.

"यानंतर मी माझ्या दुसऱ्या कामाकडे वळतो", असे म्हणून अवसरीकर यानी प्रथम ब्रम्हदेवावर चार्ज शीट भरण्यास सुरुवात केली. "सर, ब्रह्मदेवाचा तूर्तासचा कारभार एक नंबरचा गैदी आणि भोंगळ झालेला आहे. त्यांचा बराचसा टाईम निद्रासुखात व्यतीत होतो आणि त्यामुळे पृथ्वीतलावर कमालीची वजबजपुरी माजून राहिलेली आहे. मी काय म्हणतोय् याला ही आदिमाया कपिलासुद्धा साक्ष देईल."

यावर आदिमायेने आपले डोके, कान वगैरे हलवून अवचट जे बोलतोय् ते अगदी करेक्ट असल्याची अॅक्शन केली.

कोर्टाने त्याची नोंद करून घेतली.

"महादेवांच्या बाबतीत तर काही बोलायचीच सोय उरली नाही."

"नो! नो!! नॉट द्याट वे" मध्येच कोर्टाने धोंडो गुंडोला अडवून पुढे खुलासा केला की, तुम्ही तुमच्या फिर्यादीचे नीट दोन विभाग करा. अ विभागात ब्रह्मदेवाबाबतचे सर्व काम पुरे करा आणि ते झाल्यावर तुम्ही शिवशंभोंच्या ब विभागाकडे वळा. काम जरा नीट पद्धतीने होऊ दे. काम पुरे झाल्याशिवाय आज कोर्ट उठणार नाही, हे ऐकताच धोंडो गुंडो अवसरीकराला अवसान चढले. त्याने अम्मळ वरच्या पट्टीतच भाषणास सुरुवात केली—

"महाराज, ब्रह्मदेवांचं स्वतःच्या मिनिस्ट्रीकडे सध्या पूर्ण दुर्लक्ष झालेलं आहे. त्याचा पोर्ट फोलिओ त्याना झोपेपायी मुळीच पेलवत नाही असे म्हणावेसे वाटते. प्राण्यमला मानव योनीत जन्माला घालण्याचं महत्वाचं काम त्यानी स्वतःकडे न ठेवता खात्यातील केवळ सेक्रेटरी–अंडर सेक्रेटरी यांच्याकडे सोपविलेले आहे. त्यामुळे हे अधिकारी कधी फाजील उत्साहाने तर कधी मिळालेल्या अधिकाराचा दुरुपयोग करून, प्रॉडक्शन हवे तसे हाताळीत आहेत. भरपूर प्रमाणात लाचलुचपत चाललेली असल्यामुळे एकदा प्राणी चौऱ्यांशी योनीत पूर्णपणे नीट फिरलाय् की नाही, हे धड पाहिले न जाताच त्याला मानवाचा जन्म मिळू लागलाय्. बरं घडलेला मानव तरी नीट पक्का झालाय् किंवा नाही याची नीट तपासणी न होताच भराभर हा डिस्पॅच पृथ्वीतलावर केला जातोय्. महिन्या महिन्यात ब्रह्मदेव हा डिस्पॅच किती आणि कसा होत आहे हे पहात नाहीत......."

यावर ब्रह्मदेव ताडकन् उठून उभे राहिले आणि म्हणाले, "प्रभो, हे चाललय् तरी काय? आमच्या सारख्या जबाबदार व्यक्तींवर–कॅबिनेटमधील तुमच्या सहकाऱ्यांवर या यकःश्चित मानवानं आपली बत्तीशी चालवावी आणि त्याची गय करून आम्ही सर्वांनी ती ऐकून घ्यावी, हे बरोबर होतंय् असे मला वाटत नाही. हा मानवधारी प्राणी इतका क्षुद्र आहे की, त्यावर रागवायचं म्हटलं तरी त्याला मान दिल्यासारखं होणार आहे.

अनुक्रमणिका






मला फक्त त्याची कीव करावीशी वाटते. उलट आपण चालविलेल्या येथल्या या साऱ्याच प्रकाराबद्दल मात्र खेद होत आहे हे येथे मला मोठ्या नाईलाजाने नमूद करावं लागत आहे."

यावर कोर्ट काही खुलासा करणार तोच—आदिमायेने गंभीरपणे हुंबरून सांगावयास सुरुवात केली की—

"सर, हा अवसरीकर मानव जे सांगतोय् ते दुर्दैवानं खरं आहे. अनेक अर्धी कच्ची मडकी-गाडगी मी आत्ताच पाहिली. ती इन्स्पेक्ट न होताच सर्रास टाकली जात होती आणि त्यावेळी समय भर दुपारचा, चार वाजताचा—म्हणजे ऑफिस टाईमचा होता..."

भगवान विष्णूच्या चेहऱ्यावरचा बदलता भाव लक्षात घेऊन अवसरीकर पुढे झाला आणि कोर्टाच्या समोर उजव्या बाजूला असलेला पृथ्वीगोल त्यांनी सर्रदिशी फिरवला. एका विवक्षित स्थळी आपली तर्जनी स्थिरावून त्याने कोर्टाला अर्जविले—"देवा, तुमच्या या प्रॉडक्शन मिनिस्ट्रीच्या गैरकारभारामुळे भूतलावर किती भयंकर आणि किळसवाणा परिणाम होऊन राहिला आहे, याची साक्ष समक्षच पहा. आपल्या ज्ञानचक्षूंमुळं तुम्हाला सारं काही लगेच समजून येईल. उदाहरणादाखल, ही मुंबापुरी पाहा. ही एका मोठ्या राज्याची राजधानी आहे." एका विवक्षित स्थळी दृष्टी स्थिर करून भगवान विष्णू दिव्य दृष्टीने तेथील प्रकार पाहात होते. पाहता पाहता कोर्टाचे, स्थळकालाचे भान हरपले. त्यांची मुद्रा क्षणात कठोर तर क्षणात करुण दिसू लागली. कधी विषण्ण तर कधी संतापाने लाल होऊ लागली. जणु काही यापुढचं काही बघवत नाही अशा कष्टी चेहऱ्याने त्याने आपली मुद्रा उजव्या हाताने झाकून घेतली आणि ते एकदम ओरडले – रे ब्रम्ह्या, रे नालायका—काय मांडलंय् हे? अरे करतोय्स तरी काय हे, तू?

या उच्चाराबरोबर कोर्टाच्या बोटातले सुदर्शनचक्र गरगरू लागले. गदा हातातल्या हातात उसळी घेऊ लागली.

इकडे भीतीने ब्रह्मदेव जागच्या जागीच चळचळ कापू लागले.

विष्णूपन्त युगानुयुगे विश्वाचा व्याप सांभाळीत आले होते. त्यांची चीफ मिनिस्ट्री आज कित्येक वर्षे त्यांच्याकडेच चालत आलेली होती. धर्माची अतीच ग्लानी झाली तर ते जरुर तेव्हा अवतार घेत आणि लहान मोठी आश्चर्ये करीत पण सहकाऱ्यावर इतके घसरण्याचा प्रसंग यापूर्वी त्यांच्यावर कधीच आला नव्हता. कारणही तितकेच जबरदस्त असावे असे कौन्सिल हॉलमध्ये जमलेल्या सर्वांना कळून चुकले.

ब्रह्मदेवाची तर भीतीने गाळण उडाली.

पण मनाचा तोल अधिक जाऊ न देता विष्णूनी स्वतःला सावरले. ब्रह्मदेवाला देहदंडापेक्षा, सार्वजनिक रित्या एक्स्पोज करावा, म्हणजेच त्याचे हृदयपरिवर्तन होईल असे त्यांना वाटल्यावरून ते स्वतः स्तब्ध राहिले आणि दांभिक सौजन्याने म्हणाले—

"भल्या मानवा, तूच हा सारा प्रकार वर्णन कर. तुला लागलेली झळ माझ्यापेक्षा अधिक दाहक असेल. ऐकू दे या सर्व स्वर्गवासियांना












## काऊ बॉय नि गॉगल गाय

**एक होती गाय, तिला मिळाला गॉगल**
**गॉगल लावीत डोळ्याला, डोळा मारी बैलाला.**
**पॅट घालून काऊबॉय-बैल-विचारी "येऊ काय?"**
**गाय म्हणे झाडीत पाय, "एवढेच पुरे-बाय् बाय्!"**
**अशी होती गरीब गाय**
**तिचे नांव गॉगल गाय!**

**—सुमन वर्वे**

आमच्या या प्रॉडक्शन मिनिस्टरची नालायक लिथारर्जी."

काही तरी फार महत्त्वाचे ऐकवीत आहोत या भावनेने प्रेरीत होऊन यथायोग्य आवाजात धोंडो गुंडो सांगू लागलाः

"मुंबई ही एक संपन्न श्रीमंत नगरी आहे. त्यातील कोळीवाडा हे एक उपनगर आहे. या कोळीवाड्याच्या लोकसंख्येत आज हजारो हिजडे वस्ती करून राहिलेले दिसत आहेत—"

"हिजडे? हिजडे म्हणजे, एक्झॅक्टली काय?" दोनतीन कोपऱ्यातून एकाच वेळी उच्चारली गेलेली ही चौकशीची प्रश्नात्मक कुजबूज ऐकून अवचटाने खुलासा केला—

"हिजडा म्हणजे, धड ना पुरुष; धड ना स्त्री असा तृतीयपंथी मानव. ब्रह्मदेवाने घडविलेली कच्ची मडकी-गाडगी. मनुष्य जातीची एक घृणास्पद अवस्था!"

यानंतर अवचटाने या पंथाची माणसे कशी विकृत मनोवृत्तीची असतात आणि ती चांगल्या माणसाना कशी अनन्वितपणे छळतात याचे भेसूर वर्णन ऐकवले. ते ऐकत असताना—साऱ्या हॉलभर पिनड्रॉप सायलेन्स होता. आपल्या आवाजाची पट्टी अधिक करुण करून धोंडो गुंडो पुढे म्हणाला,

"आता ही वेवारशी अर्भकं पाहा. यांच्या आईबापांचा पत्ता नाही. ज्यांच्या उत्पत्तीमुळं आईबापांनाच लाज वाटत आहे असं हे बेजबाबदार प्रॉडक्शन आहे. ब्रह्मदेवाच्या फितूर गळतीचं हे लाजीरवाणं दृश्य—रस्त्यारस्त्यावर ही पैदास पडली आहे. . . बिचारी लेकरं. ."

भरून आलेला आपला गळा अम्मळ खाकरून अवसरीकर पुढे म्हणाला—

"हे पहा! देवळा मंदिरा भोवतीचे लुळे, पांगळे, आंधळे, रोगी, महारोगी. . . ! पृथ्वीतलावर उपजलेल्या असल्या प्रजेने अगोदरच महाग झालेले अन्नधान्य दुर्मिळ होऊ लागले तर आहेच, पण शिवाय मानवी संस्कृतीचा कसही या बेवारशी वाढीमुळं कमी होऊ लागला आहे. . ."

"बस्स! पुरे! ऐकवत नाही हे आम्हाला! हा विषय आता बंद. आम्हाला यावर प्रत्युत्तर द्यावयास मुळीच तोंड उरलेलं नाही. सृष्टीकर्त्याच्या अशा गुणांमुळे देवादिकांचे स्थान तुम्ही उचकून लावलेत तरी तुम्हा मानवाना आम्हाला मुळीच बोल लावता यावयाचा नाही. ब्रह्मदेवाबद्दल तू मघा केलेली सारी विधाने खरी आहेत." अवसरीकरास असे आश्वासून अपिलेट कोर्ट ब्रह्मदेवाकडे वळून गंभीर वाणीने म्हणाले—

"विश्वकर्म्याने आपल्या मंत्रीपदाचा राजिनामा द्यावा. इतकेच नव्हे तर पार्टीतूनही त्याना काढून टाकण्यात यावे इतके त्यांचे वर्तन गैर आणि गैदी झालेले आहे. या मानवानं जर आज त्याना इथं शिंगावर लटकावून आणलं नसतं तर—?" देवाने क्रोध आवरता घेतला आणि काही काळ मौन स्वीकारले.

"देवा, कोर्टाची अदब राखावयाची म्हणून मी या विषयावर अधिक काही बोलत नाही. नाहीपेक्षा या मंत्री महाशयांचे अनंत ब्रह्मघोटाळे मी तुम्हाला दाखवून दिले असते" अवसरीकराने शहाजोगी केली.

"तो खटला आता संपलाय्. तुमच्या दुसऱ्या हरीहरेश्वराच्या फिर्यादीचे काम सुरू करा."

कोर्टाने आज्ञा करताच अवसरीकर म्हणाला, "जगन्माता कपिलेच्या साक्षीनं आम्ही महादेवावरची फिर्याद सांगू इच्छितो की, त्यांचं गांजाचं व्यसन अलिकडे कमालीचं वाढलं आहे. अधून मधून शांभवी आणि नृत्य वगैरे जोडीला आहेतच. पण या महादेवाच्या चिलमीनं अगदी धराळा केलाय्. त्यामुळं मृत्यूवरील त्यांचा होल्ड कमालीचा ढिला पडलाय्. देशाला, समाजाला, कुटुंबाला ज्यांचे जिणे नकोसं झालंय्. फार काय सांगावं, ज्याना स्वतःचं जीणंच स्वतःला नको नकोसं झालंय्. असे अनंत मानवजंतू सांप्रत अवनीतलावर जगून राहिलेले आहेत. त्यांचा भार पृथ्वीला आता अगदी सहन होईनासा झालाय्. वास्तविक यांच्या नांवाची वॉरंटं कधीचीच ड्यू आहेत. पेंडिंगच्या फाईलीमध्ये ती अडकून धूळ खात पडलेली आहेत. हे तल्लफी मंत्री अधून मधून कधी तरी कामाला बसतात. पण पेंडिंगला प्रॉयॉरिटीच देत नाहीत. जन्ममृत्यूचे काही कोऑरडिनेशन राखावयास हवे ही महत्त्वाची बाबहि त्याना अजून नीट ग्रास्प करता आलेली नाही. ब्रह्मदेवाच्या दुर्लक्षामुळं झालेली नको ती वाढ, वास्तविक यानी केव्हाच निकालात काढावयास हवी होती आणि पृथ्वीवरील मानवांचा काही प्रॉब्लेम कमी करावयास हवा होता. पण तेही त्यांच्याने होत नाही. आणि त्यामुळं भूतलावरील लोकसंख्येचा प्रॉब्लेम दिवसेंदिवस ॲक्यूट होऊन राहिला आहे. महादेवांच्या इतर मोठेपणा लक्षात घेऊन घडीभर त्यांच्या व्यसनांकडे दुर्लक्ष करून त्यांचा काही कारभार क्षम्य मानावयाचा असं ठरवलं, तरी आणखी एका बाबीबद्दल होणारे त्यांचं दुर्लक्ष फार गंभीर आणि अक्षम्य आहे."

"ते कोणते?" कोर्टाने मध्येच विचारले.

"मंत्री महाशयांचा फार मोठा गुन्हा कोणता हे—सर,

अनुक्रमणिका





आपणास पुढील माहितीवरून लक्षात येईल. ज्या कधी काळी हे शिक्का मोर्तब घेऊन कामाला बसतात त्यावेळी नशेच्या अम्मलामुळं त्यांच्या हातून आंधळेपणानं वॉरंटं इश्यू केली जातात. तरणी ताठी, चांगली कर्तृत्ववान, मानवजातीला आशिर्वाद ठरणारी चांगली फुलती उमलती मानव–पुष्पं हे मंत्री महाशय खुडून टाकतात. गेल्या सहा सातशे वर्षांचा इतिहास जरी देवा आपण अवलोकिलात, आणि त्याचे सूक्ष्मतेने अवलोकन केलेत तरी मी काय म्हणतोय् याची आपणास तात्काळ खात्री पटेल. ज्ञानेश्वर–विवेकानंद–शिवाजी–केनेडी. . ."

"नको! नको!! नावानिशी पुरावे मला नको आहेत. मला ही यादी चांगली आठवतेय्. तुमची फिर्याद गंभीर आहे, मला मान्य आहे. फिर्यादीविरुद्ध कैफियत द्यायला ते महाशय आता होश-मध्येही नाहीत. गोळी चढवून कोर्टात येऊ नये हा साधा सांकेतिक शिष्टाचारहि त्यानी पाळलेला नाही. वास्तविक शंकरराव आणि आम्ही बरोबरीचे. पण आमचा नाईलाज आहे. डिस्सीप्लिन म्हणून आम्हाला त्यांच्यावरहि आज ॲक्शन घ्यावी लागणार आहे" अपिलेट कोर्टाने जाहीर केले.

जरा गम खाऊन भगवान विष्णू पुढे म्हणाले, "हे मानवा, आज खुद्द आमचाच भ्रमनिरास झालेला आहे. सारे विश्व कसे (wel-fare) वेल-फेअर आहे असे समजून अलिकडे आम्ही आमचे कामाचे तास जरा कमी केले होते आणि. . ."

"आणि शेषशायी आराम करण्याकडे प्रवृत्त झालेलो होतो."देवाचे राहिलेले अर्धे वाक्य धोंडो गुंडोने जरा आगावूपणा करून, पुरे केले.

क्षमाशील विष्णू अगोदरच इतके नर्व्हस झाले होते की, स्वतःचा मोठेपणा टिकवून धरण्याच्या मिषाने धोंडो गुंडोचे ते विधान त्यानी हसून साजरे मानले. आणि आता कोर्टाचे काम संपत आले आहे याबद्दलची वॉर्निंग बेल, वाजवली.

फायनल ऑर्डर डिक्टेट करताना भगवान् विष्णू म्हणाले,

"धोंडो गुंडो अवचट, तुला खालच्या कोर्टात झालेली शिक्षा मी रद्द करीत आहे. तुझ्या इच्छेप्रमाणं तुझा मृत्यु मी कायम करीत आहे. पण तुला मी स्वर्गातच वास देत आहे. तू या क्षणापासूनच स्वर्गवासी झाला आहेस असे समज. मात्र तुला आम्ही येथली काही ड्यूटी असाईन करणार आहोत. तुझी आम्ही स्पेशल कमीशन म्हणून अपॉईंटमेंट करीत आहोत. कॅबिनेट मंत्र्यांची सर्वच खाती आता आम्हाला जनरल ऑडिट करून हवी आहेत. हे काम तू स्पेशल अधिकारी म्हणून कर. आणि यथाक्रम तुझा रिपोर्ट तू आम्हास सादर कर. तुझ्या सूक्ष्म निरीक्षण शक्तीवर आणि अभय या गुणावर आम्ही खूष झालेलो आहोत. या क्षणा-पासूनच तू तुझ्या कामाचा चार्ज घे...."

"नो !नो!! मि. लॉर्ड, फार घाई होत आहे. सर, आपण केलेल्या माझ्या बहुमानाबद्दल मी अर्थातच तुमचा फार फार आभारी आहे. मी आपल्या आज्ञेनुसार तुम्ही मला देऊ केलेल्या कमीशनचा स्वीकारही करतो. पण, सर—मला थोडा जॉईनिंग पिरिअड मिळावयास हवा. मला एकवार तरी अवसरीस जाऊन यावयास हवे. . ."

". . .शिवाय महाराज मला आणखी एक स्पेशल सवलत आपण मंजूर करावयास हवी. अवचट घराण्यावर ड्यू असलेलं एक वॉरंट महादेवांकडून आपण मला तात्काळ इश्यू करून द्या. माझ्या सौभाग्यवती आवडीलाही मी येथे घेऊन येतो. महाराज, शक्य असेल तर मिसेस् अवचटाना तुम्ही येथे काही जॉब द्या. सुपर ॲन्युएशन होत असेल तर पार्ट टाईम द्या. ऑनरेरियमचीही काही अमुक एक अट नाही. पण त्या येथे आल्या तर तुमच्या इकडील अप्सरांचं वर्तन सुधारण्यास त्यांची आपणास निश्चित मदत होईल. निदान माझ्या पिठलं-भाताची तरी हटकून सोय होईल."

"आवडे, पिठलं!" सकाळचं पिठल कुठंय् ! ठेवलंयस ना? अग, हा पहा मी आलो. आलोय् की नाही?"

"अहो उठा, उठा ! असे ओरडता काय? रात्री बेरात्री!" आवडीने धोंडो गुंडोला गदगदा हलवून जागे केले. त्यावेळी घड्याळात ठणदिशी दोनाचे ठोके पडले.

अगं मला स्वप्न पडत होतं—किती विचित्र स्वप्न! कशाला मला जागं केलंस! तो भगवान विष्णू–तो स्वर्ग !"

"जागं करू नको तर काय करू? किती मोठ्यानं ओरडत होतात. आवडे-आवडे-हे-काय ? आणि पिठलं–पिठलं वाढ काय? इश्य! असलं कसलं स्वप्न? तरी मी नेहमी बजावते की, आता तुमचं वय झालंय्. रात्री जरा सुमार धरीत जा. पिठलं पाहिलं की, तुम्हाला अगदी भान रहात नाही आणि मग पोट दुखेपर्यंत हवरटपणा करता. आपली झोपमोड आणि दुसऱ्याचीहि झोपमोड–"

इतके बोलून आवडाबाई या कुशीची त्या कुशीवर वळली आणि पूर्ववत् घोरू लागली.

आणि धोंडो गुंडो अवचट मात्र–याची देही, याची डोळा अजिम्या काय पाहिले याचा अचंबा करीत अंथरुणावर बसून राहिला.

• • •

हळू हळू त्यांच्या गाण्याची लय अधिक तीव्र होऊ लागली. तशी त्यांचेसोबत प्यालेली 'ती' बकरीहि पायात घुंगरं बांधून नाचू लागली. मग अधिक रंग भरला न् बकरीच्या जागी पवन्याची सनान् बहीणच दर्दभऱ्या नजरेनं इष्काचे इशारे करीत नाचू लागली.......**वामन प्रभू** याना सापडलेली ही एक वात्तड बकरी नि तिचा इरसाल किस्सा !




**दिवस** हिवाळ्याचे म्हणून थंडी कडाक्याची. आणि वातावरण असे की सारा निसर्गच दारु पिऊन झिंगलेला आहे. आणि-पाना-पानांवर दारुचे टपोरे दवदार थेंब साचताहेत.

बाहेर कुणाच्या तरी घरातल्या घड्याळात ठोके पडले ते मोजून वामननं अकरा वाजल्याचं ओळखलं. आणि तो स्वत:शीच हसला. जागचा उठून त्यानं कंदिलाची वात मोठी केली आणि कंदील घेऊन डोक्याला वरचं छप्पर लागणार नाही ह्याची काळजी घेत ओणवा होऊन बकरीजवळ आला. त्यानं बकरीला पुरतं न्याहाळलं. साली मजेत होती. पुढ्यातला पाला वेगानं फस्त करीत शेपटी हलवीत होती. त्यानं काळजीपूर्वक तिच्या डोळ्यात निरखलं. तिथं त्याला अर्ध्या कंदिलाचे प्रतिबिंब दिसले. मग स्वत:चा हात आणि नंतर तिच्या डोळ्यांवर पहुडलेला नशेचा हल्का तरंग.

'च्यायला, म्हणजे हिलाहि नशा चढला म्हणायचा', तो पुटपुटला. आणि तिच्या पुढ्यात हिरव्या पाल्याचा ढिगारा रिचवून बाहेर आला.

"ओ भोसडीके" त्यानं कुणाला तरी बाहेर येऊन हाक मारली. पण भोसडिक्यानं उत्तर दिलं नाही. इतर वेळी ह्यावर तो भन्काय-चाच. पण आता एवढ्यानं त्याची खुषी खराब होणे कठीण होते.

बाहेर गर्द अंधार होता. त्याच्या पार त्याने डोळे ताणून पाहिले; तेव्हा पलिकडल्या झोपड्यांचे एकमेकात हरवलेले अस्पष्ट आकार आणि त्या मागचे सळसळणारे भले मोठे वडाचे झाड तेव त्याला जाणवले. पायातल्या रबरी चपला टाचाना फटक् फटक् थापडा मारीत होत्या तिकडे दुर्लक्ष करीत तो उत्साहात चालत होता. मधेच त्याचा पाय शेपटीवर पडल्याने कोकाट्याचे कुत्रे केकाटले. आणि एकदा आलुवाल्याच्या झोपडीच्या समोर आलेला वासा त्याला आडवा आला. पण तरीहि त्याचा उत्साहित उल्हास ओसरला नाही. नाही म्हणायला ह्या साऱ्यांच्या बापजाद्यांच्या नांवे त्यानं काही शिव्या भुंकल्या एवढेच.

"क्यो रे भोसडीके.... कहाँ मर गया था ?"

"देखो वामन. अपने को अे नही जचता. हाँ ! जब देखो तब गाली."

"रुठ गई मेरी जान !"

"मू संभाल...देख भला..."

"अरे जा...ज्या ! आज तो कमाल का दिन है...आज मैं तुझे गालिया दुंगाहि जरूर..."

"क्यो भई... खास बात...."

"हूं...इंतजाम..." वामननं आंगठा तोंडाशी नेऊन खुणेचा इशारा केला. पण समोरच्याची कळी कांही खुलली नाही.

"अबे तो..."

"देख, अभि 'चिज' का भाव बिल्कूल डौन. गल्ली गटारात लोक उनडून देऊन राह्यले."






अनुक्रमणिका

"लोक चुत्ये आहेत."

"अबे तो साला. दस दिवसात शम्भर मनुष्य मेला ह्या एकट्या नागपूर शहरात... साला सरकार आहे का का आहे."

"अब शुरु हुवारे तेरा लेक्चर."

"देखा भौ. साला ए मत करो. वो मत करो. जुव्वा मत खेलो. तो पैसा कहाँसे लाव ? शराब मत प्रिवो तो दिल कहाँ बहलाव...... बावू. आता हे टॉनिक पेत होतो. त. साल्याहूनं भट्टी बिगड्वली दहा दिस झाले. उदास राह्यतो."

"तू चालतं... डब्बल गोला हाये."

"डब्बल गोला ?"

"हाँ हाँ"

"फिर तो बिल्कुल नही. डब्बल गोला पिऊन काल पवन्या मेला."

"पवन्या मेला !"

"सकाईच नेला."

"क्योबे...तेरी माके. साले हो क्या करते हैं यहाँ ?"

"कुछ नही जमादार."

"कुछ नही के बच्चे... इधर आओ" एवढचात जणू आभाळा-तून टपकलेल्या जमादारानं दाट भरला.

मग जमादारानं त्या दोघांच्याहि तोंडाचा वास घेतला. आणि त्यांचेपैकी कुणीच प्यालेला नसल्याने गुन्हा न सापडल्यानं रागावून दोघानाहि एक एक रप्पट टिकावून दिली.

"देखो. सालेहो. कुछ गडबड करेंगे तो खबरदार... खासकर शराब के मामलेमे. थानेमे तो मरम्मत होगीच. लेकिन सजाभि अब चौबल है ! चलो भागो. कोई घरके बाहर दिखेंगा तो खबरदार."

जमादारानं मिशीवर पीळ देत दुपारचा ठाण्यातला प्रसंग आठवला. प्लेगच्या उंदिरासारखी विषारी टॉनीक पिऊन माणसं पटापट मरत होती. आणि सरकारातून धमकावणं आल्यामुळं डीएस्सपी साहेब स्वतः सर्कल साहेबावर अन् एसो साहेबावर मस्त बरसला होता. डीएस्पी साहेबाच्या रागानं थरथरणाऱ्या हिटलरकट मिशाच्या आठवणीनं त्याला आताहि हसू आलं.

जमादारानं हाकलून लावल्यावर दोघंहि तेथून खसकले होते, ते पुढच्या नाक्यावर भेटले.

खुरचेवाल्याजवळून गरमागरम भजे, आलुबोंडे अन् चिवडचाच्या पुडचा बांधून घेणाऱ्या वामनला चाहूल लागली. म्हणून त्यानं मागं वळून अदमास घेत आवाज दिला "जग्गू है ?"

"हा क्यूं"

"अबे काय को आया रे भोसडीके."

"तुही इल्लत नाही गेली. जमादार अजून घुमतच आहे."

"चाल. तुल् गम्मत दाखवतो. जमादार आला समजा माझ्या घरी त तोभि चकरावून जाईन."

"काहून..."

"आमच्यावाली बकरी. साली डब्बल गोला प्याली."

"बकरी... डब्बल गोला अन् प्याली.. वामन तुले चढली का?"

"अबे करके तो केहता हूं. मुझे कह ने दे..."

☆ ☆

घरात दोघंहि ओणवे होऊन आले. वामननं परत एकदा बकरीचं निरीक्षण केलं. साली मघाहूनहि मजेत होती. आनंदानं त्याचे डोळे बारीक झाले. आणि झटपट सारे खाद्य पदार्थ पुडचा-तून मोकळे करून त्यानं गवताच्या भाऱ्याखालून वितभर लांबीच्या दोन बाटल्या काढल्या.

"दहा दिवस झाले. साला मी भि तुझ्यावानीच उदास राह्यतो. साला शम्भर मनुष्य मेला. मग आपल्या जीवाचा भेव कोनाल् नाही ?आज युगत् काहाडली. अर्धा घंटा झाला बकरीले डबल गोला पाजून कशी ठेंय आहे. दाय तू. आता तिले ज काई झालं नाई म्हंजी. हा माल ठर्चं असलाच पाहिजे. मिला दो हातमें हात."

"च्या मायले असी गोष्ट होती रे..."

"तं ? बेटा जग्गू वस्ताद के बच्चे.. अबे भोसडीके.. आ..चल."

जग्गू वस्तादच्या बच्च्याची तेवढचानं खात्री झाली नाही. म्हणून त्यानं स्वतः जाऊन बकरीच्या तोंडाचा वास घेतला. आणि बकरीच्या डोळचातील नशिलेपणाची धुंद झाक पाहून जोर जोरानं हसू लागला.

"अबे धिरे..."

"हॉक् हॉक् हॉक् भौ हॉक् हॉक् हॉक् तुने तो सरकारकी हॉक् हॉक् हॉक्... साल्याइले म्हना आता ह्या बकरीले पकडा अन् टॉनीक पेली म्हून बारा महिने ठेवा जेलात... हॉक हॉक् हॉक्."

"अबे तो बस. अब आता है की सोडे की बोतलेहि फोडेत रहेगा फॉक् फॉक् करके."

"लेकिन तुम्हारी आयडिया भौ, बस्स. मान गये. मरे तो बकरी मरे. और बकरी को कुछ नही हुआ तो टॉनीक ठर्चं ! हॉं हॉं हॉं.."

☆ ☆

मग ह्या प्रेमळ वातावरणात पहिला ग्लास झाला. दुसरा ग्लास झाला. आणि ते दोघे व ती दारुबाज बकरी ह्यांची मैफिल फर्स्ट क्लास रंगू लागली.

बाहेर रात्र वाढत होती तसतसे वातावरण अधिकाधिक धुंद होत होते. आता दोघांच्याहि गाडचा लायनीवर आल्या होत्या. आपल्या-वर उपकार करणाऱ्या त्या थोर बकरीचे मुके घेऊन त्या महापुरु-षांनी तिचेवर खुष होऊन तिला आणखी थोडी प्यायला दिली.

"यार मजा आया. हमहि हम है तो दुनियामे क्या कम है ! ऐ बकरी तेरी हर निगाहो पे बल खा के पी गया. जमादारके मूछका एक एक बाल तोड तोड के पी गया.."

"हूं... प्यारे जग्गू तू एकदम् बकवास है..."

"जहाँपन्हा आपने कैसा पहिचाना ?"

"भोसडीके जग्गू तुम् एकदम फस्ट क्लॉस है."

"देख दादा गाली वाली..."

"त भोसडच्या फस्लक्लास म्हंजे गाली होते का ? का बे ?"

"नसन् होत. म्हनून का झालं. ह्या बकरीले म्हन् बरं तू काही बाही फर्स्ट-सेकंड..."






"वह तो हमारी साकी है."

"वामन भौ, एक गम्मत करा आता...."

"काह्य ची रे."

"ह्या बकरीले थान्यात घेऊन जाऊ. मुंशीले म्हनु गुन्हा हाय. रिपोट घ्या. श्रीपती बकरी जवजे बकरा. वय वर्षे सोळा, राहणार जुनी मंगरवारी.... नागपूर..."

"साल्या बकरीचं वय सोळा वर्षे राहीन का ?"

"त्याच्यापेक्षा लहान असली तं अग्यान म्हून सोडुन देतीन..."

"बरं मंग ?"

"मंग ?"

"तू काही म्हनत होता नं सोडुन देतीन; पकडतीन.."

"हुट्."

"हें हें खॅक् साली चहडली वाटते.."

"भाऊ एक गम्मतच करा. ह्या बकरीचा रिपोर्ट करा."

"चाल."

दोघंहि बाहेर निघाले. झोकांड्या देत रस्त्यापर्यंत आले. आणि रस्त्याच्या काठावरील पानपट्टीच्या दुकानापाशी येऊन उभे राहिले. तोपर्यंत त्यांच्या चर्चांनी इतकी विषयांतरे केली होती की. दारुवाज बकरीचा रिपोर्ट करण्याची त्यांची नवलाची योजना दूर भूतकाळात एव्हानां हरवून गेली.

"क्यों वे बनवारी के बच्चे."

"आदावर्ज है, पहिलवान."

"पहिलवान के बच्चे. पुरा मिठप लगौ. औ सिग्रेट . . ."

पानं तयार झालीत. बन्वारीनं त्यांच्या मनःस्थितीचा अदमास घेत दोन चार चुटकुले ऐकविले. पवन्याच्या बहिणीच्या दर दिवसाला अधिकाधिक बहरत असलेल्या जवानीवरून संभाषण मग पवन्याच्या मृत्यूपाशी आले. तशी वामन खवचटपणे हसला.

"साला च्यूता होता. गधेका बच्चा. . . त्याच्या घरी तं पाच बकऱ्या होत्या. थ्यानं?"

"'हौ! लेकिन?"

"साला एकदम बेवकूव. अरे पहले बकरीको पिलाव. ओ नही मरी तो तुम पिवो."

"दादा तुम याने बहोतहि दिमाखवाले. व्वा! क्या बात है. साला पंधरा दिवस झाले. कुछ दिल नहीं लगता था. प्यायले जा तं. मराचा डर. न प्या त बेचैनी. मेरे घर तो सात बकरी है. पहिलवान."

"तो फिर चिवडा बुलाव इस बात पर."

"पहिलवान, जमदार आ रहा है. जलदीसे खसक जाव. घर के तरफ चिवडा मैं भेज देता हूं."

☆☆

केकाटचाच्या कुत्र्यावर पुन्हा पाय पडला तेव्हा वामन चांगलाच चरफडला. एकतर बन्वारीनं आपल्याला मुद्दामच खसकवल्याचं त्याच्या एवढ्या उशीरा लक्षात आलं होतं. आणि भरीस भर म्हणून पवन्याच्या मृत्यूचं दुःख एकदमच तीव्रतेनं जाणवू लागलं होतं.

मग घरी पाच बकऱ्या असूनहि केवळ मूर्खपणामुळे डब्बल गोला पिऊन मेलेल्या पवन्याला शिव्या देत दोघंहि घरापर्यंत ठेचाळत येऊन पोहचले.

"एक बार क्या हुआ कि मैं खूब पिया था. खूब पिया था."

"मंग काय झालं?"

"मंग की खूब प्यालो. . . खूब प्यालो. . . अन् मंग घरच सापडेना. आता आली का नाही. . ."

"हॅं! उसमे क्या बात है, साला हरेकका दरवाजा ठोको. और 'आम्ही इथं राहतेत का' म्हून पूसत जायचं. . . ."

"तुने कैसा पहिचाना रे बुद्दु !"

"तु बुद्दु. तुवा मले हे गोष्ट छप्पनदा सांगितली. . ."

"देख जग्गु . . ."

दोघंहि आत आले. घरात अंधार होता. कंदील बहुधा वाऱ्यानं भडकून विझला असावा. आगपेटी शोधण्यामध्ये मग कितीतरी

अनुक्रमणिका





वेळ गेला. शेवटी कंदील उजळला. तोपर्यंत दोघंहि घामाघूम झाले होते. विचित्र अशा हुरहुरीनं घाबरले होते. कंदील घेऊन मग ते पुन्हा बकरीपाशी आले. ती आता खाली बसली होती. आणि तिचे डोळे बंद होते.

"जग्या तिची नाडी पाह्य व जग्या..."

"पन् भौ, बकरीची नाडी कुठं असते...?"

"ते मल् तरी कुठं ठाऊक आहे. मंग रे आता."

पण त्यांच्या ह्या गडबडीनं बकरी एकदम खडबडून उभी राहिली. अन् पुढ्यातलं गवत खावू लागली.

छातीवरचं एकाएकी आलेलं दडपण दूर झाल्यानं दोघानाहि हायसं वाटलं. मग त्यानी बऱ्याच निरर्थक गोष्टी करीत उरलेलं टॉनिक फस्त केलं. नि खुंटीवरचं ढोलकं काढून गाणे-बजावणे सुरू केले. "तेरे पूजन को भगवान बनाऊँ ब्लॉक में आलिशान !" झोप-डीच्या फुटक्या कौलारातून वामनचा चिरका आवाज बाहेर धडका मारीत होता. आणि कुठल्यातरी अनामिक एकतानतेत जग्गु मन लावून ढोलकं बडवीत होता.

हळू हळू त्यांच्या गाण्याची लय अधिक तीव्र होऊ लागली. तशी ती त्यांचेसोबत प्यालेली बकरीहि पायात घुंगुरे बांधून नाचू लागली. मग गाण्याला अधिकच रंग भरला. शेवटी तर ते इतके रंगले की बकरीच्या जागी आता पवन्याची सनान् बहिणच दर्दभऱ्या नजरेनं इष्काचे इशारे करीत नाचू लागली.

'हाय कुरबान्, हाय कुरबान्' वामन हातानं छाती पिटीत ओरडला.

"साल्या बकरी हाये..."

"चप्, पवन्याची बहीण हाये..."

आबे त "बकरी हाये."

वामननं ग्लासाला चिकटलेलं टॉनिक जिभेने चाटून भानावर येत पाहिलं. च्या मायची !! म्हंजे बकरीच. साली नाचती है. "व्वा... साल्या पवन्याच्या पाच बकऱ्या इले असाच डबल गेला देऊन नाच-वलं तं. काय मज्जा ! पवन्या च्युत्या होता साला... जग्गु रे...

"जी हुजूर"

"हुजुर के बच्चे. ए बकरी नाच रही या मर रही?"

वामनच्या प्रश्नानं जग्गुच्या अंगावरचा केसन् केस ताठ उभा राहिला. दोघानंहि भेदरल्या मनानं, धडकत्या छात्यानिशी कंदी-लाची वात मोठी करून बकरीकडे पाहिलं. ती गडबडा लोळत होती. तिच्या तोंडाला फेस आला होता. तिने डोळे पांढरे केले होते. आणि ती एकसारखी तंगड्या लांब व ताठ करीत होती. तिचा तो मृत्यूशी चालू असलेला झगडा पाहून दोघांचीहि हृदये शहारली. गोठून गेल्यासारखे ते बकरीचे मरण पाहत उभे राहिले.

काही मिनिटातच बकरीनं प्राण सोडला. तशी चवताळून जग्गु वामनवर तुटून पडला. "भोसडीके...तरी मी नाही म्हनत होतो". आणि कसलाहि विचार न करता त्याला बदडून काढू लागला. येऊ घातलेल्या मृत्यूच्या भयानक जाणीवेने गलितगात्र झालेल्या वामनला त्या अनपेक्षित हल्ल्याचा प्रतिकार करणं सुचलंच नाही. तो अधिकच गोंधळल्याने जग्गुला जास्तच चेव आला. ●●●

# हीरोइझमचा मुलामा चढवलेले
# पाश्चिमात्य 'स्वैरपट'

जेम्स् बॉंड पलंगावर आडवा पडला आहे. त्याचा एक हात आहे रिव्हॉल्व्हरवर नि दुसऱ्या हाताशी आहे एक रती. पुनः पुन्हा नजर खिळवून ठेवणारी. अंगावरल्या झिरझिरीत वस्त्रानी शेकडो 'रसिकां'ची नजरबंदी करणारी. किंवा बॉंड उभा नि ती लावण्यवती त्याच्या पायाशी कोसळलेली. तुम्हीहि ढासळलेले !

असली गल्लोगल्लीची पोस्टर्स आणि त्यामुळं गल्ला भरणारे गुप्तहेरपट—निशापट, त्यांचे प्रेक्षक आणि कलात्मक अभिरुचि याचा विचार साक्षेपाने होणं आवश्यक आहे.

शान्ताराम खळे

डॉ. नो मध्ये
उर्सुला अँड्रेस



**काही** अपवाद सोडले तर भारतीय चित्रपटात कथेच्या बाबतीत तोच तोचपणा दिसून येतो, चित्रणाच्या क्षेत्रात सफाईचा अभाव प्रत्ययास येतो नि अभिव्यक्तीच्या दृष्टीने पाहू जाता कारभार यथा तथाच असल्याचे आढळून येते.

—आणि म्हणूनच चोखंदळ चित्रशौकीन बहुशः परदेशीय चित्रपटांकडे, त्यातल्या त्यात पश्चिमी देशातून येणाऱ्या चित्रपटांकडे आकर्षिले जातात. साधारणतः भारतीय समाजातील उच्चभ्रू मंडळी परदेशी चित्रपटांबद्दल जास्त कौतुक करताना दिसतात. भारतीय चित्रपटांबद्दल तुच्छताच त्यांच्याकडून दर्शविली जाते. 'देशी ते हिणकस नि परदेशीय ते सरस' ही मुळातलीच त्यांची वृत्ती नि भारतीय चित्रपटांचा त्या मानाने खालचा दर्जा असल्याने त्यांच्या त्या वृत्तीबद्दल त्याना दोष देण्यातहि अर्थ नाही ! पांढरपेशा तरुण वर्ग व विशेषेकरून महाविद्यालयीन विद्यार्थीगणहि अमेरिकेत वा ब्रिटीश चित्रपटानी बऱ्याच प्रमाणात मोहित झालेले असतात. त्या चित्रपटातील मुक्त जीवनाचे बहुधा त्याना आकर्षण वाटत असल्यास नवल नाही. त्या चित्रपटांचा त्यांच्यावर इतका पगडा बसलेला आढळून येतो की त्यांच्या तोंडी त्यातील गाण्यांचे चरण घोळत असतील नि काही नटांचे त्यांच्याकडून अनुकरणहि केले जात असेल.

अशा ह्या सर्वसाधारण परिस्थितीत एक दिवस इआन फ्लेमिंग ह्या पाश्चिमात्य लेखकाच्या लेखणीतून साकार झालेला (व कित्येक दिवस ग्रंथातूनच बंदिस्त झालेला) जेम्स् बॉंड रुपेरी जगतात प्रकट झाला 'डॉक्टर नो'च्या रूपात आणि परदेशीय चित्रपट शौकीनांच्या आवडीला वेगळीच कलाटणी मिळाली. इआन फ्लेमिंग ह्यांचा तो गुप्तहेर नायक तसा गुप्तहेर कथा रसिकाना परिचित होता. परंतु चित्रपट रसिकाना त्याची ओळख 'डॉ. नो' ह्या युनायटेड आर्टिस्टस्‌च्या चित्रपटाद्वारेच प्रथम झाली. त्याच सुमारास अमेरिकेतील तरुण अध्यक्ष श्री. केनेडी ह्यानाहि इआन फ्लेमिंगचे वाङ्मय फार आवडते असे प्रसिद्ध झाल्यामुळे तर 'डॉ. नो'च्या मार्गाने पुढे आलेला जेम्स् बॉंड तरुणांचा जणु प्राणप्रिय बनून गेला. खुद्द मुंबईतहि जेम्स् बॉंडला काही कमी चाहते लाभले नाहीत. 'डॉ. नो' अपेक्षेबाहेर यशस्वी ठरला आणि त्याच्या मागून प्रकाशित झालेल्या 'फ्रॉम रशिया विथ लव्ह'ने तर मुंबापुरीतील रीगल सिनेमात दीर्घकाल प्रस्थान ठेवले. (त्यावेळी तिकिटांच्या रांगेत उभ्या राहणाऱ्या तरुण तरुणींच्या जमावावरून जेम्स् बॉंडने त्या वर्गाला किती मोहित करून टाकले आहे त्याची कल्पना येऊ शकली.) युनायटेड आर्टिस्टने त्या दोन जेम्स् बॉंड-चित्रपटानंतर '**गोल्ड फिंगर**' व '**थंडर बॉल**' हे आणखी **दोन**











**'फ्रॉम 007 वुइथ लव्ह' या चित्रपटातील मारामारीच्या एका दृश्यात जेम्स बाँड**

त्याच व्यक्तिरेखेवरील चित्रपट काढले असून कोलंबिया कंपनीतर्फेहि 'कॅसिनो रॉयल' हा जेम्स बाँड–चित्रपट निर्माण करण्यात आला आहे.

**इआन** फ्लेमिंगच्या उपरिनिर्दिष्ट चित्रकथात तसे म्हटले तर विशेषेकरून तरुण-वर्गास आवडणाऱ्या साहसीवृत्तीला प्राधान्य देण्यात आलेले असल्याने जेम्स बाँड ही व्यक्तिरेखा त्या वर्गावर छाप पाडून गेल्यास त्यात काहीच वावगे नाही. त्या साहसी व्यक्तीला मोजक्याच अर्ध-नग्नावस्थेतील स्त्रियांची गुन्हेगाराच्या तलासात उगाचच मदत घ्यायला लावण्यात आलेली असते हे निराळे ! परंतु जेम्स बाँडच्या होणाऱ्या त्या प्रचंड स्वागतामुळे युरोपातील काही मतलबी निर्मात्याना काहीतरी घबाड मिळाल्यागत होऊन त्यानी गुप्त हेर चित्रपटांच्या नावाखाली एका मागून एक चित्रपटांचा रसिकांवर मारा सुरू करून आपले उखळ पांढरे कर-ण्याचा आज सपाटा चालविला आहे. त्यांच्या त्या 'साहसा'तून बाहेर पडलेले 'पॅनिक इन बँकॉक', 'हाँगकाँग हॉट हार्बर', 'सीक्रेट एजंट एफ्. × १७', 'ओ. एस्. एस्. ११७', 'एस्पायोनेज इन लिस्बन', 'इंटरपोलकोड ८', 'ओ. एस्. एस्. मिशन' 'फॉवर ए किलर', 'मिशन ब्लडी मेरी' हे चित्रपट मुंबईत येऊन गेले. स्वदेशात चांगले दिवस न पाहिलेल्या त्या विदेशीय चित्रपटातल्या काहींनी इकडे लोकप्रियता संपादन केली. नुकतेच एक्सेलसिअरमध्ये 'बर्लिन अॅपॉइंटमेंट फॉर स्पाइज' ने बरेच दिवस ठाण मांडले व 'एस्पायोनेज इन टँजियर्स' हा चित्रपटहि असाच लोकप्रिय ठरून गेला. हे जे चित्रपट येऊन गेले वा येण्याच्या वाटेवर आहेत त्यात तशी कथा म्हणून काही असेल तर शपथ ! त्यांचे भांडवल कोणते असेल तर ते म्हणजे खून व वैषयिकता ह्या-खेरीज काही नाही. त्यातले बहुतेक सारे चित्रपट फक्त प्रौढासाठी मंजूर करण्यात आलेले असले तरी त्या प्रौढात कोणता वर्ग असतो ते पाहिले म्हणजे आमच्या संस्कृति संरक्षक सेन्सॉर मंडळाची कीव आल्यावाचून राहात नाही ! आमच्या प्रौढ तरुण तरुणींच्या मनावर त्या चित्रपटातील हिंसक कृत्यांचा व वैषयिक दृश्यांचा किती भयानक परिणाम होत असेल त्याची कल्पनाच करवत नाही.

**ह्याच** चित्रपटांच्या जोडीला आजकाल 'निशा चित्रपटां'ची भर घालण्यात येत असून आमच्या छेल छबेल्याना एका वेग-ळयाच ओंगळ जगताकडे खेचून नेण्याची अहमहमिका चालू असल्याचे दिसत आहे. 'वर्ल्ड बाय नाइट' ह्या नावाचे येऊन गेलेले क्रमांक १ व क्रमांक २ चे हे चित्रपट, तसेच 'ओरिएंट बाय नाइट', 'विमेन बाय नाइट', 'पॅरिस शँपेन', 'स्कँड्ल इन सोरेंटो', 'लव्ह स्पेशालिस्ट', 'स्वीट स्वीट नाइट' ह्यावर आज उडया पडत आहेत. त्यातले मीहि काही पाहिले आहेत. त्यात चित्रपट म्हणून काय आहे तेच मला कळत नाही. विविध नाइट क्लबातील जवळ जवळ संपूर्ण नग्नावस्थेतील स्त्रियांच्या, (नृत्याच्या नावाखाली) ओंगळ दृश्यांची केलेली गुंफण म्हणजेच तो एकेक चित्रपट होय, ह्या-पलीकडे काही नाही. नग्नांच्या त्या गोंध-ळांचेच ते जाहीर प्रदर्शन अगदी सेन्सॉरच्या संमतीने मांडले जाते हे विशेष होय.

**असे** हिणकस अभिरुचीचे चित्रपट दाखवून परदेशी चित्रपट निर्माते व वितरक आपली तुंबडी भरीत असतातच. दुसऱ्या बाजूला अत्यंत दर्जेदार असे सोज्वळ चित्रपटहि तुफान लोकप्रिय होऊन चालत असल्याचे हृदयंगम दृश्य पाहावयास मिळते. 'माय फेअर लेडी', 'फ्लाइंग मशीन', 'ग्रेट रेस'-सारखे चित्रपटहि परदेशीय चित्रपट पाहण्याचा शौक असणाऱ्यांच्या कल्पने-बाहेर पसंतीस पडले आहेत व पडत आहेत. रॉजर्स अँड हॅमरस्टीन ह्यांच्या 'दि साउंड ऑफ म्युझिक' ह्या संगीतप्रधान कौटुंबिक चित्रपटाने तर लोकप्रियतेचा विक्रमच केल्याचे पाहून अशा सोज्वळ करमणुकी-साठीहि रसिकजनता हपापलेली आहे हे सिद्ध होते. 'दि साउंड ऑफ म्युझिक'मधील ते सर्वांच्या परिचित असे घरो-ब्याचे वातावरण. त्यातला ममतेच्या साह्याने एका रुक्ष कुटुंबात निर्माण केलेला ओलावा नि गोडवा, हलक्या फुलक्या पण मधुर संगीताने बहरलेली ती कौटुंबिक फुलबाग; एवढेच नव्हे तर त्यातली ती विचार परिप्लुत पण अगदी साध्यासुध्या रीतीने रचलेली गीते कोणाला नाही संतोष देणार ? नमुन्यादाखल पुढील एकच गीत पहा—

You wait little girl, on an empty stale

# पहिला 'बोलका' नायक 'मूक' झाला

भारतीय चित्रपट सृष्टीतील पहिला 'बोलका' नायक आता 'मूक' झाला आहे—'धर्मवीर संभाजी' आता देवा घरीं गेला आहे. 'नेताजी पालकर' आतां समरात शांत झाला आहे. एक साधा माणूस आता देवाने आपल्यातून उचलून नेला आहे. विठ्ठल रघुनाथ देसाई नामक कोल्हापुरी सोंगटी आता चित्रपटांच्या पटावरून उचलली गेली आहे. चित्रपट रसिकांचा लाडका मास्टर-विठ्ठल आता त्याना फक्त 'माजी' चित्रपटात दिसेल. प्रत्यक्षात मात्र ते बांधेसूद शरीर. गोड हंसणे, ती चपळता, झेप आणि झोक आता त्याना दिसणार नाही. आता ते सारे संपले. 'कालार्पण' झाले. मास्टर विठ्ठल मी प्रत्यक्ष पाहिला. मूकपटात पाहिला आणि आलम आरा ह्या पहिल्या चित्रपटातहीं पाहिला आहे. त्याचा संभाजी व नेताजी पालकर मला अजूनही आठवतो. पावन खिड, सूनबाई, मीठभाकर, रामशास्त्रीं हेही चित्रपट मला स्मरतात. मला हा मर्द (मराठी) नायक अधिक आवडतो. नायक हा नायक वाटला पाहिजे. ते गर्भात असतानाच त्यांचे वडील वारले. नातलगानी जमीन जुमला लुबाडला. दहा बारा वर्षाचे असताना मा. विठ्ठल घरातून पळाले. आणि राजापूर नाटक मंडळींच्या बिऱ्हाडी दाखल झाले. तेथें त्यानी स्त्रीभूमिकानी आपल्या कला जीवनाची सुरूवात केली. पण कांही आगळे करण्याच्या भूमिकेने ते कोल्हापूरला आले. महाराष्ट्र फिल्म कंपनींत ते १९२३ त ऑफिस बॉय म्हणून लागले. मूक 'नेताजी पालकर' मध्ये एक्स्ट्रॉं म्हणून त्यानी सर्वप्रथम काम केले. १९२५ ते शारदा फिल्म कं. त आले. 'बाजीराव मस्तानी'त त्याना एक सामान्य योद्धयाची भूमिका मिळाली. सुलोचना (रुबी मायर्स) ह्या त्या काळच्या लोकप्रिय नटीने त्यांना इंपिरियल कं. त नेले. त्यामुळे शारदा फिल्म कं. ने फिर्याद केली. वकील होते कायदे आझम महंमदअल्ली जिन्हा हे. शेवटी 'जास्त पगार' ही कसोटी ठरली व मा. विठ्ठल 'इंपिरियल' वासी झाले. 'हाणामारी' करणाऱ्या पन्नासहून अधिक चित्रांचे नायक होते मा. विठ्ठल ! कंपनीं इंपिरियल कंपनी !

१९३० सालीं भारताचे पहिले 'बोलके' चित्र तयार झाले. त्याचे नायक म्हणून प्रथम मेहबूबखॉं (सुप्रसिद्ध दिग्दर्शक) निवडले गेले होते. पण मा. विठ्ठल हे सर्वश्रेष्ठ व लोकप्रिय नट होते त्या काळचे. म्हणून त्यांना 'नायक' करण्यात आले. व भारताचा पहिला 'बोलका' नायक होण्याचा बहुमान त्याना मिळाला. चित्रपट बोलू लागल्यावर भाषेची अडचण उभी राहिली. आणि ते दादा तोरण्याचा हात धरून मराठी चित्रपटाकडे वळले. १०० चे वर मराठी चित्रात त्यानी भूमिका केल्या. त्यांची भूमिका असलेल्या 'साधी माणसं' ह्या चित्रपटाला ह्या वर्षीचा राष्ट्रपति पुरस्कार मिळाला आहे.

मा. विठ्ठल ह्यांचा स्वभाव दिलखुलास होता. लोभस होता. चित्रपटाच्या क्षेत्रात पैसा मिळविला. कर्तृत्व गाजविले. विविध मोहांच्या वातावरणात राहूनही ते वाहवले नाहीत निर्व्यसनी राहिले. पैसा राखला. माणुसकी राखली. 'साध्या माणसा'-प्रमाणेच साधे राहिले. दररोज सायंकाळी सायकल हाती घेऊन (तीवर न बसता) मा. विठ्ठल कपिलतीर्थावर भाजी आणायला जात असत ही त्यांची आठवण हृद्य नाही असे कोण म्हणेल?

मराठीतल्या ह्या पहिल्या 'बोलक्या' नायकाला आम्हीं 'मूक' मनाने श्रद्धांजलि अर्पण करतो.

—आदित्य

For fate to turn the light on
Your life, little girl is an empty pale
That men will want to write on
• • •
You are sixteen, going on seventeen
Baby, its time to think
Better beware
Be canny and careful
Baby you are on the brink
You are sixteen going on seventeen
Fellows will fall in line
Eager young lads
And ronges and cads
Will offer you food and wine
Totally unprepared are you
To face a world of men
Timid and shy and scared are you
Of things beyond your ken
You need -someone older and wiser
Telling you what to do......

'दि साऊंड ऑफ म्युझिक'मधील एक सोज्वळ कौटुंबिक दृश्य



असे हे गीत सान बालिकाना आणखीहि खूप उपदेशामृताचे यथायोग्य घुटके पाजते पण जे काही उधृत केले आहे त्यावरून ह्या चित्रपटाच्या उच्च दर्जाची कल्पना येऊ शकेल.

'साउंड ऑफ म्युझिक'वर मी विस्ताराने हे जे लिहिले आहे ते हेच सांगण्यासाठी की खून व लैंगिक गोष्टीनी खच्चून भरलेले, दर्जाने हीन व अभिरुचीने निकृष्ट चित्रपट प्रदर्शित करून तरुण मुलांमुलीवर अनिष्ट परिणाम घडविण्याऐवजी विदेशीय चित्रपट प्रदर्शक सोज्वळ करमणूकप्रधान चित्रकृति प्रदर्शित करण्याकडेच लक्ष पुरवितील, तर समाजाला चांगले वळण लावण्याचे महत्कार्य त्यांच्याकडून होईल व पैशापरी पैसाहि त्यांच्या पदरात पडेल ह्यात शंका नाही.

• • •

अनुक्रमणिका

# भिन्न वाङ्मय प्रकारांची पण वाचनीय पुस्तके

**आज** ज्या दोन पुस्तकांचे समीक्षण करत आहे ती दोन्ही भिन्न वाङ्मय प्रकाराची आहेत. अर्थात ती कोणत्याहि प्रचारकी स्वरुपाची नाहीत हे कलेच्या दृष्टीने पूरक होय. ही पुस्तके म्हणजे श्री. विजय तेंडूलकर यांचे 'अजगर आणि गंधर्व' आणि श्री. विठ्ठलराव घाटे यांचे 'मनोगते'.

हे दोन्ही लेखक रसिक वाचकास ज्ञात आहेत. दर्जेदार लिखाण करणारे म्हणून काही प्रमाणात मान्यहि आहेत. काही प्रमाणात म्हणण्याचे प्रयोजन असे की, दोघेहि समानधर्मी लेखक नाहीत, एकाच पिढीचे प्रतिनिधी नाहीत. विजय तेंडूलकर मुख्यत्वे आहेत नाटककार, तर विठ्ठलराव घाटे हे कवि प्रकृतीचे ललित निबंधकारच प्राधान्याने आहेत. विठ्ठलरावानी यशवंतराव होळकरांवर वाचनीय असे एक नाटक लिहिलेले असले तरी ती त्यांची एक कृति आहे, प्रकृति नव्हे. तेंडूलकरांचे नाट्य हे जसे बलस्थान आहे तद्वत घाट्यांचे ललित निबंध आणि व्यतिरेखा हे सामर्थ्य म्हणता येईल.

विजय तेंडूलकर आणि घाटे यांच्या साहित्याच्या संदर्भात आणखीन् अन्वर्थक फरक • असा की, घाटे मराठीतील 'रवि किरण मंडळ' नावाचा एक वाङ्मयीन किंवा कवि संप्रदाय होऊन गेला त्या प्रभावळीतले आहेत, तर विजय तेंडूलकर अशा कोणत्याहि संप्रदायात सापडलेले नाहीत. या अनुषंगाने घाट्याना जुन्या पिढीचे आणि तेंडूलकराना नव्या पिढीचे प्रतिनिधी म्हणता येईल.

यावरून या दोघांच्या साहित्याचे नवे–जुनेपण सिद्ध करावयास गेल्यास ते तर्कदुष्ट ठरेल. तर्कसंगत जर साहित्यात काही ठरत असल्यास, ती त्या त्या वाङ्मयकृतीची कलेला मारक न ठरता अभिव्यक्त झालेली आशयनिष्ठा. तंत्र अमान्य करता येण्यासारखे नसले तरी साहित्याचा 'साहित्य' नावाचा मंत्र नसल्यास सारे तंत्र तकलादू ठरण्याची शक्यता आणि धोकाच जास्त असतो.

साहित्याचा मंत्र ज्याने साकारतो अशा तीन पैलूंचा पुनरुच्चार करण्याची विशेषत: आज फार आवश्यकता आहे. पहिला वाचनीयता, दुसरा रसवत्ता आणि तिसरा वाचनाने निर्माण झालेला रस भाव-विश्वात स्थिर होणे. या स्थिर होण्याच्या किंवा करण्याच्या प्रक्रियेलाच पुन:प्रत्यय म्हटलेले आहे. कोणतीहि साहित्यकृति हातात घेतल्यावर वाचवलीच नाही तर कार्यभाग आटोपलाच की. पण एकदा वाचावयास घेतल्यावर पुस्तक सोडवणे आणि वाचून झाल्यावर त्या पुस्तकाच्या जगातच मन रेंगाळणे हे रसवत्तेचे लक्षण आहे. एकदा हा रस निर्माण झाल्यावर तो घालवू नये वाटणे आणि मनात तो सारखा राहावा अशी इच्छा होणे याला भाव स्थिर होणे म्हणता येईल. या अनुषंगाने तेंडूलकरांचे '**अजगर आणि गंधर्व**' आणि घाट्यांचे '**मनोगते**' ही दोन्ही पुस्तके वाचनीय आहेत या बाबतीत फारसे दुमत होऊ नये.




**अजगर आणि गंधर्व • मनोगते**

सामाजिक शिष्ठाचारात 'लेडिज फर्स्ट' म्हणतो तद्वत् साहित्य क्षेत्रात एल्डर्स म्हणजे वडिलधारे फर्स्ट समजून आणि मानून घाट्यांच्या मनोगताचे पदर प्रथम पाहणे औचित्यपूर्ण आणि समर्पक ठरेल. पारंपरिक पद्धतीने कुणी विचारले की, 'मनोगते' काय आहे? तर उत्तर देणे तेवढे सरळ आणि सोपे नाही. कारण 'मनोगते' साहित्याच्या कोणत्याहि रूढ आणि स्थिर वाङ्मय प्रकारात बसत नाही. बसवता येत नाही. पण बसवण्याचा खटाटोप कां करा? 'मनोगते' हातात घेतल्यावर वाचकाला आपल्या विश्वात ओढून नेतात. हृद्‌गत सांगतात. काही ठिकाणी सांगतही नाहीत. स्वगतासारखे निवेदन वाटते. पण ते रुचीर आहे. मनोगतात आत्मलक्षीपणा, बहिर्लक्षीपणा, सिंहावलोकन, चिंतन, कुठे कुठे प्रकट चिंतन–मंथन अशी मनाची उघडझाप चालू आहे. त्याची खुबी अशी की वाचताना कुठेहि खटकत नाही. ओढून ताणून मांडले आहे असे वाटत नाही. त्यातून एक आगळी सहजता झिरपते. सुरवातीच्या "कॅशिया भरारला" यातील मनोगत या दृष्टीने पाहणे मोठे उद्‌बोधक आहे. घाटे लिहितात, 'मन मोठं चमत्कारिक असते. काळाच्या प्रवाहात अनेक गोष्टी मागे रहातात आणि आपण पुढे वाहत जातो. जावेच लागते. थांबता येत नाही. मागे फिरता येत नाही. काळ हा एकेरी मार्ग आहे. काही काळपर्यंत मान वाकवून मागे पाहता येते. मागचे बरेचसे दिसते, मग बरेचसे कमी दिसू लागते. आपण दूर जातो. वळण येते. वळावे लागते. मागचे दिसेनासे होते. पुढच्याची दखल घ्यावी लागते. माझे तसेच झाले. नवनव्या घटनांची, अनुभवांची दखल घ्यावी लागते.'

मनोगतातील हा परिच्छेद घाट्यांच्या जीवनावरच केवळ प्रकाश टाकत नाही तर या पुस्तकातील एकंदर मजकुरावरहि तो प्रकाश टाकतो. तो असा की या पुस्तकातहि काही नको त्या गोष्टींचा, परिच्छेदांचा आणि अर्थहीन प्रसंगाचा अंतर्भाव केला आहे. 'काही विचार' यातील क्रमांक १ आणि ३



अनुक्रमणिका

सामान्य आहेत. निराळे नाहीत. त्यांची मांडणीहि खास नाही. त्याचप्रमाणे 'लाला लजपतरायांची शताब्दी' हा चारपानी मजकूर अगदी पंतोजी ठशाचा वाटतो. किंबहुना 'मनोगतात' भाषण करण्याचा आणि उपदेशाचा अंश आणण्याचा मोह काही ठिकाणी टाळता आला असता तर बरे झाले असते असे वाटते. 'मोठेपणाची चिरफाड' यातील संशोधकांवरचा घाटचांचा तीव्र संताप त्यांच्या रसिकतेला छेदणारा वाटतो. 'संशोधकाना महाराजाइतके (शिवाजी) उंच होता येत नाही. ते महाराजांच्या मोठेपणाची चिरफाड करतात, शकले करतात आणि त्या शकलांचे माप घेतात.' हे वाटपाचे विधान सकृत्‌दर्शनी मनाला स्पर्शून जाते. पण लगेच जाणवते ते असे की संशोधकाचे काम सत्य संशोधन का एखाद्याला मोठे ठरवणे? शिवाजी महाराज किंवा लोकमान्य टिळक हे मोठे होते हा काही वादाचा मुद्दा नाही. पण संशोधकानी आपले संशोधनाचे काम सोडून टोळभैरव बनावे अशी अपेक्षा करणे कुठपत बरोबर होईल. हे झाले एक. दुसरे असे की ज्याच्या त्याच्या कामाचा आवाका आणि मर्यादा नको का आपण पाहावयास? एक मात्र खरे की वाढत्या वयाने घाटचांची संवेदनक्षमता बधिरली नाही. ती नाजूक राहिली आणि तिची वेदना अशा शब्दातून जी प्रकटते तिचे स्वतःचे एक लावण्य आहे.

तसे पाहिले तर असं खटकणारं घाटचांच्या पुस्तकात असूनहि ते वाचवते. चित्ताला आव्हान करत राहते. कारण घाटचांची कल्पना लय साधते. नादात येते. हरणासारख्या गोंडस आणि चपल उड्या मारत निसर्गाचे आणि जीवनाचे कोवळे ती खुरडते. त्या खुरडण्यात एक माधुर्य आणि सौंदर्य प्रस्फुटते. घाटे म्हणतात, 'विनाकारण वाकड्या तिकड्या उड्या मारू नका. तुमच्या विचाराचा पाय लचकेल. मनात विचार येईल त्यावर फारसे संस्कार न करता त्याला प्रकट होऊ द्या. तो आपले पाहून घेईल. तो मुळातच दुबळा असला तर बाहेर पडल्यावर दूरवर जाणार नाही.'

घाटचांची मनोगते वाचल्यावरहि जाणवते की घाटचानी वाकड्या तिकड्या विचारांच्या उड्या मारल्या नाहीत. पण काही उड्या सहज वाटाव्या अशी दक्षता घेण्यात आली आहे. एक असा विचित्र विचार आला की, या पुस्तकावरचे घाटे हे नांव बदलून पुस्तक छापले तर?- घाटे या नावाबरोबर भरदार बनणारे व्यक्ति वाङ्मयाचे साहचर्य नाहीसे होईल आणि कदाचित् हे एक सामान्य पुस्तक ठरायचे. दुसरा असाहि विचार आला की मागे अनंत काणेकरानी स्वतंत्र रुपक कथा जिब्रानच्या शैलीत लिहिल्या तसं कुणी टोपण नाव घेऊन घाटचांच्या शैलीत 'मनोगते' टंकित केली तर? म्हणजे असे कीं, 'मनोगता'त जी शैली आणि निवेदन आहे ते एखाद्या शब्द प्रभूला मनात आणलं तर जमण्यासारखं आहे. यामुळेच 'मनोगते' या पुस्तकाला एक साहित्य कृति म्हणून कमालीच्या मर्यादा पडल्या आहेत. मनोगते एक वाचनीय पुस्तक असा निर्वाळा द्यावयास मात्र मुळीच हरकत वाटत नाही.

**अजगर आणि गंधर्व** हे सहा नाटिकांचे श्री. विजय तेंडूलकरांचे पुस्तक सर्वच्या सर्व वाचनीय आहे असे म्हणता येणार नाही. परंतु या नाटिका वाचून काढल्याच पाहिजेत असे त्या वाचल्यावर म्हणावेसे वाटते. कारण त्यातील जे चित्रण आणि दर्शन आहे ते लक्षणीय आणि चिंतनीय आहे. वाचनाच्याच भूमिकेने पाहिल्यास सहापैकी पाच एकांकिका वाचनीय आहेत आणि त्यातहि 'अजगर आणि गंधर्व,' 'मादी,' 'बिचारे अप्पा बंड करतात' या फारच फर्मास आहेत. 'खलित्यांची लढाई' ही नाटिका चिकाटीने वाचावी लागते. वाचनाच्या दृष्टीने ती रटाळहि–वाटते. वास्तविक आशयाच्या दृष्टीने ही नाटिका अतिशय अर्थघन असूनहि असे कां व्हावे? या नाटिकेचा प्रयोग कसा होत असेल ?

आज मराठीत जे नाटककार आणि जी नाटके आहेत त्यांच्यात विजय तेंडूलकरांचे स्वतंत्र आणि वैशिष्टचपूर्ण स्थान आहे. रंगभूमीवर शेकडोंच्या प्रयोगानी त्यांची नाटके किंवा एकांकिका या गाजल्या किंवा गाजविल्या गेल्या नाहीत तरी नाटच क्षितिजावरचा हा नाटककार सर्व रसिकाना विचार करावयास व दाद घेण्यास लावणारा आहे याबद्दल कुणी वाद घालेल असे वाटत नाही. मराठीतील काही आजच्या प्रथितयश आणि लोकप्रिय नाटककारांप्रमाणे लोकरंजनाचा मालमसाला नाटकात न वापरताहि तेंडूलकरांचे नाव नाटककार म्हणून स्थिर व मान्य झाले हे विशेष होय.

मराठी नाटकांची नावे आणि विषय बदलले तरी त्यांची स्थिती एकंदरीत 'बाटली नवी पण दारू तीच' अशी आहे. याला अपवाद फक्त दोनच. एक कै. नाना जोग आणि दुसरे विजय तेंडूलकर. नाटच ज्याच्यातून उद्‌भवते आणि संभवते असा संघर्ष जीवनात अनादि









काळापासून आणि जीवनाच्या अंतापर्यंत असतो. पण बदलत्या परिस्थितीत आणि उत्क्रांत व क्रांत होत जाणाऱ्या समाजात आणि जगात माणसाची जाणीव–नेणीव बदलते. आंदोलित, कंपित, संपदित, अंकुषित आणि आनंदित होणारे मन निराळी परिमाणे धारण करत असल्याने संघर्षाचे स्वरूप आणि आविष्कार यात मूलभूत फरक पडतो. परिस्थिती आणि माणूस, माणूस आणि प्रसंग ही जी एकोणीसाव्या शतकात, विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात जीवनाच्या जडण-घडणांच्या स्थूल पार्श्वभूमिवर वागत व वावरत होती तसे आता राहिले नाही. परिस्थिती आणि माणूस, आणि माणूस आणि प्रसंग याला माणसाचा आंतरमनाचा आणि मनातील अनेक पापुद्र्यांच्या 'तिळा' उघडला आणि नवेच संघर्ष व समस्या यांचे दर्शन झाले. या समस्या व संघर्ष यांचे स्वरूप खोल आणि सूक्ष्म आहे. या अनुषंगाने मराठी नाटकाचे स्थूल नाटच आणि सूक्ष्म नाटच असे विभाग विवेचनाच्या सोयीकरता पाडल्यास सूक्ष्म नाटचाचे आजचे एकमेव पण समर्थ असे प्रतिनिधि म्हणून विजय तेंडूलकरांच्याकडेच बोट दाखवावे लागेल.

तेंडूलकरांच्या नाटिका किंवा एकांकिका या अशा सूक्ष्म संघर्षाचा वेध घेणाऱ्या असल्याने त्यांची लांबण नसते. पण आजच्या आपल्या एकंदर जीवनाला ग्रासणाऱ्या आणि व्यापणाऱ्या, आकसणाऱ्या आणि अंकित करणाऱ्या समस्यांचे आणि तदनुषंगाने जीवनाला झाकाळून टाकणाऱ्या वेदनेचे जे नाटचरूप त्यात असते त्याला अंत नाही, हेच तरलतेने सूचवलेले असते. आजच्या आपल्या वैश्य संस्कृतीचा प्रभाव असलेल्या नागर जीवनात एकंदर भानगडी आणि लफडी माणसाला कसा बनवतात याचे पहिल्याच एकांकिकेतील निरुपण पाहण्यासारखे आहे. स्वत: ठेवलेल्या बाईला शेठ सांगतो:

'केसमधून बचावलो तर तुला दुसरा एखादा शेठ गाठूनदेखील द्यायची मी थोडी खटपट करेन. नाही असे नाही, ओळखी आहेत माझ्या. तू काही न जमलं तर धंदा करा. त्यागात अर्थ नाही. व्यवहार पाहावा माणसानं. अजगरासारखं असावं माणसानं. मिळेल तेवढे खावं. पण ताठपणा नको. जमेल तेव्हा जोर करावा नि बाकी भुईसपाट असावं. माणसाला कमरेखालचा सैतान प्रभावी का कमरेवरचा देव समर्थ हीच तरी आजची शोकांतिका आहे आणि याचे जणु महाभारतच आपल्या वेचक शब्दानी, सूचक संवादानी आणि तरल शैलीनी तेंडूलकर नाटचरूपाने अभिव्यक्त करतात. 'समोरचा नाडकर्णी' म्हणजे आजचे आपले स्वकेंद्रीत, संवेदनाहीन पण सुख धुंडाळणारे आणि मागे मागे सरकणारे जीवन किती संकुचित झाले याचा पडताळा देणारे वस्तुनिष्ठ नाटच होय. आजच्या आपल्या जीवनातील मानसिक विभाव–अभाव, वासना–विकार आणि उणीवा–जाणीवा यांच्या पार्श्वभूमीवरून संघर्ष इतक्या गतीने येतात–जातात की त्या आवक–जावकीत आपण बधीर होतो. काय होत आहे हे समजते पण उमजत नाही. तेंडूलकरांच्या एकांकिका अशा गतिमान व सूक्ष्म संघर्षाना आपल्या चिमटीत यथार्थपणे पकडू शकल्या आहेत हे त्यांचे खरे यश. आज त्यांच्या एकांकिका सर्वसाधारणपणे स्वत:चे रौप्यमहोत्सव करून घेत नाहीत हे त्यांचे एका परीने व्यावहारिक अपशय असले तरी ते कलात्मक सुदैवाचे चिन्ह मानले पाहिजे. त्यांच्या एकांकिका ह्या उद्याच्या माणसाकरता आहेत. उद्याच्या जगाच्या आहेत.

नाटच म्हणजे त्याचे प्रयोग असे समीकरण येतेच. तेंडूलकरांच्या या एकांकिका रंगभूमीवर सर्वच्या सर्व साकारतील व आवाजतील काय? मला एक प्रसंग आठवतो. बेकेटचे Waiting For Godo वाचताना वाटेल की त्याचा प्रयोग अशक्य. दामू केंकरेना जेव्हा मी हे सांगितले तेव्हा ते म्हणाले, "मी हे नाटक वाचले नाही. परंतु इंग्लंडच्या रंगभूमीवर पाहिले तेव्हा वाटले की हे नाटक वाचून कळणार नाही."

तेंडूलकरांच्या नाटिका वाचताना असाच अनुभव आला. चांगला दिग्दर्शक लाभला तर समसमा संयोग येतो. तेंडूलकराना तसा दिग्दर्शक आहेच.

—दा गो दे

## कर्तबगार समाजसेविका

मडगांवचे प्रसिद्ध सामाजिक कार्यकर्ते श्री. द. ना. दलाल यांच्या सौ. सावित्रीबाई ह्या कर्तबगार पत्नी. त्या पिरुबाय या नावाने प्रसिद्ध होत्या. त्यांच्या संबंधी अनेक परिचितानी आणि त्यांच्या आप्तानी लिहिलेल्या या आठवणी मडगावच्या स्नेहवर्धक महिला समितीने संपादित केल्या आहेत. या विविध आठवणीतून पिरुबायचे संपूर्ण जीवनचित्र साकार झालेले आहे.

पिरुबायचा जन्म मडगावमध्ये इ. स. १८९५ मध्ये झाला. वयाच्या अकराव्या वर्षी त्यांचा विवाह झाला. धार्मिक वाङमयाची त्याना आवड होती. ज्ञानेश्वरी आणि दासबोध हे त्यांच्या खास व्यासंगाचे ग्रंथ. त्यांचे पति श्री. दत्ताबाब दलाल हे मडगावच्या श्री सरस्वती सेवक मंडळाचे एक संस्थापक असल्यामुळे व्याख्यानांच्या निमित्ताने ह. भ. प. पांगारकर, न. चिं. केळकर, प्रा. न. र. फाटक प्रभृति अनेक विद्वानांशी त्यांचा परिचय झाला. त्यातून त्यांचा व्यासंग वाढला. मूळातली बाळबोध वळणाची पिरुबाय अध्यात्मावर अधिकार वाणीने चर्चा करी. व्याख्याने देई. फार काय, पोर्तुगीज राजवटीतील अन्यायाविरुद्ध आपल्या भाषेत धीटपणे दाद लाऊन घेई.

या आठवणीतून पिरुबायचे व्यक्तिमत्व आविष्कृत झाले आहे. त्या आदर्श गृहिणी होत्या. कर्तबगार समाजसेविका होत्या. आणि आतिथ्यशील प्रेमळ माता होत्या. त्यामुळे स्वकीयातच नव्हे तर सर्व समाजातच त्याना लोकप्रियता मिळाली. त्या १ सप्टेंबर १९६४ साली दिवंगत झाल्या. या पुस्तकाला प्रा. वसंत कानेटकरांची प्रस्तावना असून मुखपृष्ठावर चित्रकार दलाल यांचे पिरुबायचे उत्कृष्ट चित्र दिलेले आहे.

—अविनाश केळकर

(**सौ. सावित्रीबाई दलाल यांच्या आठवणी** : प्रकाशक—व्यंकटेश अ. नायक दलाल, मडगाव, गोवा, किंमत दोन रुपये).

अनुक्रमणिका



## अनंत भालेराव



**दिलीप** चित्रे यानी नुकतेच कशा तरी संदर्भात म्हटले की, 'मराठी गद्याची स्वाभाविक उपज अत्र्यांच्या लेखनात जशी दिसते तशी अन्यत्र दिसत नाही'. चित्र्यांच्या या मौलिक मताशी भेद न दाखवताहि असे म्हणावेसे वाटते की, अशा स्वाभाविक मराठी गद्याची उपज असलेला एक पत्रकार मराठीत आहे. आणि तो म्हणजे औरंगाबाद येथून निघणाऱ्या 'मराठवाडा'या द्विसाप्ताहिकाचे संपादक **श्री. अनंत भालेराव**. ज्यानी 'मराठवाडा' पत्रातले अग्रलेख वाचले आहेत त्याना मी काय म्हणतो ते पटावयास आयास पडणार नाहीत.

या संबंघात कोणत्याहि क्षेत्रात अस्सल वळण कसे टिकते आणि ते जीवनानुगामी कसे राहते हे पाहणे मोठे अन्वर्थक ठरेल. स्वतंत्र प्रज्ञेचा माणूस जेव्हा जगण्याशी इमान राखतो आणि निर्भय वागणे समान्न ठेवतो तेव्हा आविष्काराला अनाहूत मुलामा देण्याची गरज लागत नाही. अनुभव, चिंतन आणि आव्हान यांच्यात शब्द ढवळून निघतात आणि अंगभूत बल घेऊन उद्‌भूत होतात. अनंतरावाना कांही दिवसापूर्वी जेव्हा शिक्षा झाली तेव्हा त्यानी जे प्रकटपणे लिहिले ते असे 'पत्रकार म्हणून आम्ही हे स्वच्छपणे सांगतो की, कायद्याप्रमाणे केलेले आरोप न्यायासनासमोर सिद्ध करण्याची जबाबदारी इतर कोणत्याहि पत्रकाराप्रमाणे आमच्यावर अवश्य आहे. खरे काय व खोटे काय हा वाद सनातन म्हणून बाजूला ठेवू, पण जो पत्रकार न्यायासनासमोर आपले आरोप सिद्ध करू शकत नाही त्याला शिक्षा ही झालीच पाहिजे. पत्रकाराच्या स्वातंत्र्याला संयमाचा आधार याचमुळे मिळू शकेल. म्हणून झालेल्या शिक्षेसाठी आम्ही नि:शंकपणे तयार आहो. न्यायासनासमोर मान तुकवण्यास आम्हास कसलाच संकोच वाटत नाही. न्यायासनाविषयी नागरिकांच्या मनातील आदर वाढत जाईल व विश्वास वृद्धिगत होईल असा प्रयत्न करणे हे लोकशाहीनिष्ठ पत्रकार म्हणून आम्ही आमचे कर्तव्यच समजतो.'

अनंतराव स्वत:ला साहित्यिक म्हणवत नाहीत. परन्तु ते स्वत:ला काय म्हणतात किंवा म्हणवतात हे एक कोडेच आहे. साहित्याच्या बैठकीत सामील होतील आणि गौण बनतील. यक्षप्रश्न आला तर मार्दवानं पण ठाम बोलतील. तेच बोलणे तारून नेणारे ठरेल. श्रेय मात्र संस्थेला देतील. राजकारणात स्वयंसेवक किंवा सैनिक बनतील, मागे राहतील. जबाबदारी स्वीकारतील. पार पाडतील. आणि फलप्राप्तीच्या समयी कुणी भलताच येऊन लोणी मटकावू लागला तर हेवा करणार नाहीत. जे विमनस्क बनतील किंवा वैफल्याच्या गर्तेत सांपडतील त्यांच्यावरोवर अंतर्मुख बनतील, त्या त्या व्यक्तीला अंतर्मुख व वस्तुनिष्ठ करण्याकरता . कारण त्याना पक्के कळलेले आहे की, खिळे जे ठोकले जात आहेत त्याचा अंत असा सहजासहजी होत नाही. दरवेळेस जेव्हा तळपलेले उन व वाहते पाणी डोळस माणसाना दिसते तेव्हा त्यात रक्ताचा अंशहि वाहत असतो. नुसती दृष्टी स्वच्छ असूनच चालत नाही तर जीवनहि स्वच्छ असावे लागते. आणि जीवन स्वच्छ करण्यास व ठेवण्यास प्रत्येकाने प्राणपणाने हातभार लावायचा असतो. त्याची 'सोल एजन्सी देऊन भागत नाही– !'

—याचमुळे अनंतरावांच्या आयुष्यात त्यागाचे, देशभक्तीचे, हालअपेष्टांचे, आर्थिक अपुरेपणाचे ना स्तोम असते, ना प्रदर्शन. घरात सदा कुणाचा तरी होल्डॉल असतो, कुणी ना कुणी आपल्या पंचायती त्यांच्यावर टाकत असतो, निरनिराळ्या क्षेत्रातली माणसे 'हा आपला माणूस म्हणून त्यांच्याकडे अभयाकरता धावत असतात आणि या सर्वात सारख्याच समरसतेने रमलेले अनंतराव एखाद्या समारंभाला निघतात. मग कुणी तरी थट्टा करतो 'आता कोट वदला.' दुसरे कुणीतरी म्हणते, 'अनंतराव धोतराला ठिगळ लावले पाहिजे'– अनंतरावाना धुन निराळीच असते. जीवनात किती शिकण्याचे आणि पाहण्याचे राहिले आहे. ते केल्याखेरीज नुसती ठिगळे लावून काय उपयोगाचे ? जीवनाचे महावस्त्र नित्यनूतन राहावयाचे तर त्याला ढिगळे लावण्याची नव्हे तर ते वस्त्र फाटणार नाही याची काळजी जरूर आहे !

ज्ञानेश्वरांच्या नेवाश्याशी कुलपरंपरेनं संबंध असलेले अनंतराव निजामी विरुद्धच्या लढ्यात 'हरहर महादेव' करून मृत्यूला सामोरे गेले. दोनदा पत्रकार संघाचे अध्यक्ष झाले आणि 'टाळी' शिल्लक ठेवण्याकरता बोटचेपेपणा नाही केला. अगदी बडी बडी मंडळी जिथे सत्य कथनावयास कचरतात तिथे अनंतरावानी निधड्या छातीने व्यासपिटावरून नाट्याचा आविर्भाव न आणता खरे काय ते पोटतिडकीने सांगितले. याचीच परंपरा मुंबई पत्रकार संघाचे महनीय प्रवक्ते म्हणून जेव्हा गेल्या जुलैत ते आले तेव्हा पुढे चालू ठेवली.

– एवढं सारं करून अनंतराव कुठे गेले असतील म्हणता ? या अफाट मुंबईत अनेक रांगापैकी कोणत्यातरी रांगेत उभ्या असलेल्या सामान्य माणसाकडे–आपल्या मित्राकडे, दिवस व रात्र घालवायला. 'हा माणूस' असा माणूस आहे !

## अत्रे–फडके

**हा** अत्रे–फडके वाद नाही. ह्या विषयावर वाद घालण्याचे आम्हाला काय कारण? तो वाद घालायचाच झाला तर ही दोन माणसे तो वाद घालण्यास समर्थ आहेत. आणि त्याची प्रचीतीही

त्यानी महाराष्ट्राला वारंवार दिली आहे. व्याख्यानातून, वृत्तपत्रातून, अन्य लेखनातून व गप्पातूनही हा वाद तूर्तास तरी संपलेला नाही. अधुनमधुन त्याचे लहान मोठे उद्रेक होत असतात. ह्यात बरोबर कोण, चूक कोण हे ठरविणारे आम्ही कोण? वाद न संपणे हे एका अर्थाने सजीवतेचे लक्षण आहे. म्हणूनच मागे अमरहिंद मंडळाच्या व्याख्यानमालेत दोघानी एका व्यासपीठावर येऊन हा वाद एकदाचा संपवावा असे सुचविल्यावर आचार्य अत्रे ह्यानी हे आवाहन स्वीकारले आणि फडक्यानी नाकारले. ह्या वादात आम्ही पडू इच्छित नाही. त्याचे प्रयोजनही आम्हाला नाही. आमच्या मते महाराष्ट्रापुरता तरी अत्रे–फडके हा एक वादातीत विषय आहे. त्यात तर तम करायला त्या दोघानीच वाव ठेवलेला नाही. त्यासाठी त्यानी दोघानी महाराष्ट्राच्या शैक्षणिक, सामाजिक आणि वाङ्मयीन क्षेत्रात एवढी अपार कामगिरी करून ठेवली आहे. आचार्य प्रल्हाद केशव अत्रे ह्या व्यक्तीच्या सर्व गुणदोषांची ओळख आता महाराष्ट्राला नव्याने करून देण्याची गरज नाही. प्राध्यापक नारायण सीताराम फडके हे नाव महाराष्ट्राच्या घराघरात, अगदी स्वयंपाकघरात, मुलामुलीच्या अभ्यासाच्या खोलीत (अगदी इतिहास भूगोलाच्या पुस्तकाच्या आत सुद्धा) शिरले आहे. आधुनिक महाराष्ट्राच्या सामाजिक, सांस्कृतिक व वाङ्मयीन इतिहासातले हे दोन्हीही 'सूर्य'च आहेत असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. दोघांच्याही वाङ्मयीन कर्तृत्वाचा झपाटा एवढा मोठा आहे की, असामान्य कर्तृत्व व इच्छाशक्ति, जीवनावर, जीवनांतल्या सौंदर्यावर असलेली असीम श्रद्धा ह्याशिवाय हे घडणे नोहे! आचार्य अत्रे ह्यानी जीवनाच्या विविध स्तरांतून प्रवास केला आणि जय–पराजय पचविले. प्रा. ना. सी. फडके ह्यानी आरंभी राजकीय चळवळीत भाग घेतला असला तरी त्यांची खरी कर्तृक घडली ती साहित्याच्या व शिक्षणाच्या प्रांती! साहित्यात सुद्धा फडके यानी कथा–कादंबऱ्या–चरित्रे–लघुनिबंध लिहिले; गाजविले, हे खरे असले तरी फडक्यांचे देणे त्याहून महत्वाचे आहे असे आम्हाला वाटते. फडके ह्यानी मराठीला "साहित्य–विचार" देण्याचा मोठा व यशस्वी प्रयत्न केला. त्यासाठी त्यानी लेखणी–वाणी अक्षरश: झिजविली. कला–जीवन वाद मागे खूप गाजला होता. कलेचे मोठेपण, तिची पृथगात्मकता, तिची अंगभूत शक्ति ही फडके यानी नेहमीच महत्वाची मानली आणि आज सर्व नव्या–जुन्या टीकाकारानी जवळजवळ हीच भूमिका घेतलेली दिसते. कलाबाह्य–निकषांचे बाबतीत आजचा रसिक व टीकाकारही जागरुक आहेसे दिसते. त्या विशुद्ध कलावादाचा झुंजार पुरस्कार प्रा. फडके ह्यानी प्रथमपासून केला. आजही फडके ह्यांची भूमिका कायम आहे. घट्ट झाली आहे. 'प्रतिभासाधना' वर टीका खूप झाल्या. पण 'प्रतिभासाधना'सारखे कलाप्रकारांची मूलगामी चर्चा करणारे पुस्तक अजूनही झाले नाही. अजूनही बी. ए. एम्. ए. च्या विद्यार्थ्याला 'फडके' च वाचावा लागतो ही वस्तुस्थिति नाकारता येत नाही. प्रा. फडके ह्यांचा 'साक्षेप', नीटनेटकेपणा, योजनापूर्वक काम करण्याची पद्धत, शिस्त व त्याहून मोठे म्हणजे निवेदन–भाषा–लालित्य ह्या गोष्टी नव्या पिढीने गिरविण्यासारख्या आहेत. 'सौंदर्य' हा स्थायीभाव असल्याने फडके ज्याला स्पर्श करतात ते 'सुंदर' होते. प्रा. फडके ह्यांची सर्वच मते आम्हाला पटतात असे नाही. पण फडक्यांच्या मतांचा शांत डोक्याने विचार करावा लागतो येवढ्या तोलामोलाची ती खासच असतात असे म्हणता येईल. प्रा. फडके ह्यांचे वक्तृत्वही त्यांच्या लेखणीइतकेच सुललित आहे. फडक्यानी मराठी वाङ्मयाप्रमाणेच वक्तृत्वालाही 'शैली' दिली आहे असे मी म्हटले तर ते गैर ठरू नये! फडके यांच्या १६३ पुस्तकांपैकी दोन तीन तरी त्या कालनौकेत शिल्लक राहतील असं ते पुण्याच्या सत्कारप्रसंगी म्हणाले. फडके फाजील विनयशील नाहीत. फडके रोख आणि चोख आहेत. तरीही वयाच्या ७२ व्या वर्षी प्रा. फडके विनयाने बोलले (वयाचा परिणाम तर नसेल?) असेच मी म्हणेन. कारण फडके यांच्या कितीतरी कादंबऱ्या, त्यांचे प्रतिभासाधन, प्रतिभाविलास, लघुकथा तंत्र मंत्रासारखी पुस्तके जगली आहेत. काळाने पसंतीची पावती त्याना दिली आहे. आणि फडके ह्यांच्या ७२ व्या वाढदिवशी आम्हीही आमचीही एक पावती नोंदवितो.

आचार्य अत्रे ह्यांच्या 'प्रकृती'चा जेव्हा मी विचार करतो तेव्हा मला एकच उत्तर वारंवार मिळते. "**प्रचंड इच्छाशक्तीचा माणूस**" हे ते उत्तर! अत्रे यांच्या साऱ्या कर्तृत्वाचा उगम ह्यात आहे. त्यांची मनस्विता सुद्धा यातून आली आहे. जीवनावर जबर प्रेम आहे म्हणूनच जीवनही ह्या माणसावर दुथडी भरून वाहते आहे! 'काय हवं ते घे' असं म्हणत सारे वर जणु ह्या माणसाच्या पाठीशी धांवताहेतसे वाटते. यामुळेच आचार्यांच्या प्रतिभेने अनेक चमत्कार इये प्रांती करून दाखविले आहेत! 'बालमोहन' युगानंतर 'नाटककार अत्रे' संपला असे कांहीना वाटले. पण **'तो मी नव्हेच'** चा **चमत्कार** घडला, आणि आता अत्रे पुन्हा चमत्कारामागून चमत्कार घडवीत आहेत! **'मी मंत्री झालो'** ह्या नाटकाने अत्रे यांनी नवे 'रेकॉर्ड' निर्माण केले आहे. "**कांही लिहिले तरी खपेल** असे **नाही**." "**चांगले दिले तरच खपेल**" ही खात्री बाळगून अत्रे यांची प्रतिभा फुलतेसे दिसते. अत्रे यांचे हे नवे नाटक म्हणजे केवळ उपरोध नाही. यांत गंभीर राजकीय-सामाजिक आशय आहे. तिसरा अंक म्हणजे अत्र्यांच्या प्रतिभेचा चमत्कारच! पण अत्रे अजूनही अशांत आहेत. अतृप्त आहेत. धगधगताहेत–धडपडताहेत आणि यातच त्यांच्यातल्या प्रचंड इच्छाशक्तीचा व त्यांच्यातल्या थोर कलावंताचा प्रत्यय येतो. आणि ही इच्छाशक्तीच त्याना यश देईल. त्याना कार्यरत राखील. त्यांच्या प्रतिभेला चिर–तरुण राखील अशी ग्वाही देता येते–**'मी मंत्री झालो'** पाहिल्यावर!

अत्रे–फडके हे विषय आमच्यापुरते वादातीत आहेत असेच आम्ही मानतो त ह्याच अर्थाने! महाराष्ट्रही ह्या मताशी सहमत आहे अशी आमची खात्री!!








# कै. डॉ. दामोदर धर्मानंद कोसांबी :

गेल्या महिन्यात डॉ. कोसांबी– ते डी. डी. कोसांबी या नावाने अधिक ओळखले जात असत – वयाच्या ५९ व्या वर्षी काळाच्या भक्ष्यस्थानी पडले. काळ आपल्या भक्ष्याची निवड करताना व्यक्तीच्या गुणाकडे, कृतीकडे किंवा मानव समाजाच्या गरजांकडे मुळीच लक्ष देत नाही. तो केव्हा, कशी, कुणावर झडप घालील हेच सांगता येत नाही. तशीच झडप त्याने डॉक्टर डी. डी. कोसांबी यांच्यावर घालून त्यांच्या पत्नीला व मुलींना तर अनाथ व दुःखी केलेच आहे; पण डॉ. कोसांबींना जाणणाऱ्या व मानणाऱ्या त्यांच्या जगभरच्या चाहत्याना व अनुयायानाही कायमचे निराधार केले आहे. मराठीत 'मराठा' सोडल्यावर डॉ. कोसांबींची दखल कितीशी घेतली गेली हे दुःखद्पणे स्पष्ट आहे. माणसाच्या मोठेपणापेक्षा माणसाच्या जातीकडे व राजकीय तत्त्वज्ञानाकडे पाहून, त्याची उपेक्षा करावयाची किंवा त्याचा उदो उदो करायचा ही प्रवृत्ती भारतीय समाजातून आजही समूळ निघून गेलेली नाही. डॉ. कोसांबींनी हयातभर निमूटपणाने कोणताही गाजावाजा न करता, इतिहास, वाङ्मय, संस्कृतभाषा व गणितशास्त्र या क्षेत्रातील आपले संशोधन अखंड चालू ठेवले होते. गोमंतकातील सारस्वत समाजात जन्माला आलेली कोसांबी पितापुत्रांची जोडी, जगविख्यात झाली आहे व आपल्या अभिनव सिद्धान्त मांडणीमुळे नवविचार प्रणालीमुळे अमर झाली आहे. स्फूर्तीदायी ठरली आहे.

डॉ. दामोदरांचे वडील धर्मानंद कोसांबी यांच्याएवढा बौद्ध तत्त्वज्ञानाचा भाष्यकार विसाव्या शतकात दुसरा कोणी क्वचितच होऊन गेला असेल. स्वतंत्र विचारशक्ती, राष्ट्रसेवा व त्याग हे महान् गुण डी. डी. नी आपल्या तपस्वी पित्याकडूनच घेतले होते. तारुण्यात हार्वर्ड विद्यापीठात अत्यंत अवघड असा गणितशास्त्राचा अभ्यास अवघ्या दोन वर्षात आटोपून १९२९ साली डी. डी. भारतात आले व पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजात गणिताचे प्राध्यापक झाले. प्राध्यापकी करीत राहूनही गेल्या वीस पंचवीस वर्षांच्या काळात त्यानी जे संशोधनात्मक प्रबंध प्रसिद्ध केले आहेत त्यांची संख्या मोठी आहे व या प्रबंधानी जगातील मान्यवर विद्यापीठातील विचारवंतांचे लक्ष वेधून घेतले आहे. पित्यामुळे प्राचीन भारतीय इतिहासाचे संशोधन करण्याचे वेडही, त्यानी स्वतःला लावून घेतले. पुरातन नाण्यांचा स्वतःचा संग्रह त्यानी केला होता. भर्तृहरीच्या 'शतकावरही' त्यानी संशोधनात्मक ग्रंथ लिहिला व कार्ल मार्क्सला त्यानी तो अर्पण केला होता. मार्क्सवादी शास्त्रीय विचारांचा त्यांच्या संपूर्ण चिंतनावर सखोल प्रभाव पडलेला होता. भारतातील एक अग्रगण्य मार्क्सवादी विचारवंत डॉ. गंगाधर अधिकारी म्हणतात, 'डॉ. कोसांबी यांचे भारतीय इतिहासावरील ग्रंथ म्हणजे मार्क्सच्या ऐतिहासिक भौतिकवादाच्या भारतीय इतिहास-संशोधनात, केलेला विवेचक प्रयोग होय." गणितक्षेत्रातील 'स्टॅटेस्टिक्स' (Statistics) म्हणजे 'परिगणन' याविषयावरही डॉ. डी. डी. कोसांबींचा अधिकार फार मोठा होता व त्यानी त्याविषयी मांडलेले कित्येक सिद्धान्त विश्वमान्य झाले आहेत. या संशोधनांबद्दल त्याना F.R.S. हा अत्युच्च बहुमान देण्याचे जागतिक शास्त्रज्ञ मंडळाने ठरविले असताही, केवळ डी. डीं. च्या राजकीय मतांमुळे, त्याना तो बहुमान नाकारण्यात आला. 'टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फन्डामेंटल रीसर्च' या संस्थेने अणुसंशोधनाशी संबंधित असलेल्या आपल्या गणित विभागाचे प्रमुख म्हणून त्यांची नेमणूक केली होती. परंतु जागतिक शांतता चळवळीशी (World Peace Council) असलेला आपला संबंध सोडण्यास त्यानी नकार दिल्यामुळे टाटा संस्थेने त्याना वय होण्यापूर्वी सक्तीने सेवानिवृत्त होण्यास भाग पाडले होते.

त्याना 'आर्थरायटिस्'चा विकार होता. तरीही दुर्दम्य ध्येयवादाच्या व अतिमानवी इच्छाशक्तीच्या बळावर त्यानी अखेरपर्यंत आपले ज्ञान संपादनाचे व ज्ञानदानाचे कार्य प्राचीन काळच्या ऋषींच्या निष्ठेने व उद्योगक्षमतेने चालू ठेवले होते. 'भांडारकर रिसर्च इन्स्टिट्यूट'मध्ये बसून तासन् तास भूर्जपत्रावर लिहिलेले विविध भारतीय भाषांतील प्राचीन लेखन ताडून पहात बसलेले, भर्तृहरीच्या 'शतकां'चा व भगवद्गीतेचाही मूलगामी व तत्त्वशुद्ध अन्वयार्थ लावण्यात गढून गेलेले, प्रसिद्धिविन्मुख पण कार्यसन्मुख, असे डॉ. दामोदर धर्मानंद कोसांबी यापुढे आपल्याला कधीच पहावयास मिळणार नाहीत, ही घटना भारतीयांची अंतःकरणे व्यथित करणारी आहे.

'An Introduction To A Study Of Indian History' (1956) इतिहासाच्या अभ्यासाची प्रस्तावना, व 'The Culture And Civilization Of Ancient India In Historical Outline (लंडनः १९६५) : प्राचीन भारताच्या सांस्कृतिक जीवनाची रूपरेखा, हे त्यांचे ग्रंथराज अमर ठरले आहेत. 'दीपावली'चे गोमंतकाच्या या महान सुपुत्रास अनंत प्रणाम. त्यांची पत्नी व त्यांच्या मुलींच्या दुःखात 'दीपावली' समदुःखवेदनेने सहभागी आहे. डॉ. डी. डी. कोसांबींच्या चरित्राचे वाचन व त्यांचा आदर्श समोर ठेवण्याची प्रेरणा 'दीपावली'च्या वाचकाना सतत होवो !

–सारस्वत

## 'क्षिप्रेकाठी' कथेतील आशयाबद्दल एक खुलासा

'दीपावली'च्या गेल्या जुलै महिन्याच्या अंकात 'क्षिप्रेकाठी' ही श्री. जितेंद्र अभिषेकी यांची कथा प्रसिद्ध झालेली आहे. त्या कथेतील कांही जातिवाचक शब्दांवरून आपल्या भावना दुखविल्या गेल्या अशा अर्थाचे वालचंदनगर नागरिकांचे एक पत्र आलेले आहे. याबद्दल खुलासा एवढाच की, ही कथा पूर्णपणे काल्पनिक असल्याने व कथेत वापरलेल्या जातिवाचक शब्दांचा वापर हा केवळ प्रसंगनिष्ठपणे केल्याने बुद्धया एखाद्या भारतातील जातीचा अपमान करण्याचा लेखकाचा हेतु नाही; संपादकांचा तर मुळीच नाही. भारतातील सर्व जाती जमातीबद्दल आम्हाला नितांत आदर आहे. लेखातील तशा जातिवाचक संदर्भामुळे काही अपमानास्पद वाटल्यास याठिकाणी आम्ही दिलगिरी व्यक्त करीत आहोत !

–संपादक

# बॉम्बे आर्ट सोसायटीचा अमृतमहोत्सव

'बॉम्बे आर्ट सोसायटी' या महाराष्ट्रांतील चित्रकारांच्या नामवंत संस्थेने पंचाहत्तराव्या वर्षात पदार्पण केले व त्यानिमित्त आपले प्रतिवार्षिक-विशेषनामाने अमृतमहोत्सवी-प्रदर्शन भरविले. संस्थेची प्रतिष्ठा आणि पूर्वपरंपरा लक्षात घेऊन आम्ही हे प्रदर्शन पाहायला मोठ्या आशेने गेलो पण एकंदर परिस्थिती पाहून दारुण निराशा पदरी आली. कसोटी सामना संपल्यानंतर उघड्या पडलेल्या मैदानाला जी एक सुन्न अवकळा असते तशी अवकळा हे प्रदर्शन पाहाताना आम्हाला जाणवली.

**नवथर चाळ्यांचे वर्ष**

एके काळी बॉम्बे आर्ट सोसायटीचे वार्षिक प्रदर्शन म्हणजे मुंबापुरीतील चित्रकार, छायाचित्रकार, शिल्पकार या कलावंताना दिवाळसण वाटायचा. प्रत्येकाच्या मनात जिद्द, चुरस, उमेद आणि निर्मितीची विलक्षण ओढ असायची. आपण काहीतरी भव्य, दिव्य असे केले पाहिजे, श्रेष्ठाना दिपविले पाहिजे, दाही दिशा दणाणून सोडल्या पाहिजेत अशी जाज्वल्य भावना मनात ठेवून जो तो कलावंत कार्यरत असे. बक्षिस मिळो न मिळो पण आपली कलाकृती स्वीकारली, प्रदर्शनात मांडली गेली या गोष्टीचे महत्त्व होते. अशा प्रत्येक कलाकृतीभोवती प्रेक्षकाचा जीव घुटमळायचा. आज ती परिस्थिती राहिली नाही. बॉम्बे आर्ट सोसायटी वयाने वाढली.....पंचाहत्तर वर्षांची झाली पण तिची शान राहिली नाही; नवथरांबरोबर ती चळल्यासारखी वाटली.

**एक नवे आवाहन**

हे अमृतमहोत्सवी प्रदर्शन भरविण्याच्या आधी दोन तीन महिने सोसायटीच्या कार्यकर्त्यांकडून चित्रकाराना व शिल्पकाराना एक आवाहन करण्यात आले होते. ते आवाहन असे की, 'संगीत' हा विषय घेऊन त्यावर कलावंतानी आपली निर्मिती करावी. वास्तविक हा विषय उत्कृष्ट होता. विविध शैलीने यावर निर्मिती करता आली असती. कला आणि प्रतिभा यांचा संगम ज्या कलावंतांच्या ठिकाणी झालेला आहे त्याना तर ही पर्वणीच होती. नव्या संप्रदायात ज्यानी लौकिक मिळविला आणि अभिजात परंपरेत जे नांव मिळवून बसले अशा दोन्ही प्रकारच्या कलावंतांची चुरस दिसून आली असती; पण सोसायटीने हा विषय देऊन दोघांचेही पितळ उघडे पाडले असे विधान करावे का ? मग त्यानी या प्रदर्शनात कां भाग घेतला नाही? मुंबापुरीतील एकाही नामवंत चित्रकाराचे चित्र या प्रदर्शनात दिसले नाही ते का? की सोसायटीशी मतभेद वा अंतर्गत कलह आहे म्हणून?

तसे असेल तर आम्ही या ठिकाणी एक नवे आवाहन करतो की, 'मित्र हो, संगीत हाच विषय घेऊन आपण सर्व जुन्या व नव्या नामवंत कलावंतानी आपापल्या उत्कृष्ट कलाकृतींचे असे एक वेगळे प्रदर्शन भरवावे आणि महाराष्ट्रातील चित्र-शिल्पकलेची आजची प्रगत स्थिती चोखंदळ रसिकांच्या निदर्शनास आणावी!' असो!



## असे पाहिले — असे ऐकले

**उडदामाजी काळे गोरे**

बॉम्बे आर्ट सोसायटीच्या या अमृतमहोत्सवी प्रदर्शनात एकंदर ८९ कलाकृती मांडलेल्या आहेत. या प्रदर्शनाचा दर्जा अतिशय सामान्य असून थक्क व्हावे अशी एकही कलाकृती वा प्रतिभेची जोड एकाही निर्मात्यात दिसली नाही. 'मेघ मल्हार' हा त्यातल्या त्यांत अर्थध्वनित करणारा आणि सर्वसामान्याच्या कुवतीला पेलणारा राग. आणि याच रागावर आधारलेल्या जवळजवळ सतरा अठरा कलाकृती आढळल्या. त्यात श्री. मधु पोवळे यांची हिंदुस्थानी शैलीची कलाकृती बरीच उजवी होती. त्यातील ढगाळ धूसरपणा आणि आलेखनातील गोडवा दृष्टीवेधक वाटला. पहिल्या बक्षिसास पात्र ठरलेले हिंदुस्थानी शैलीतील श्री. मालवणकर यांचे चित्र कारागिरी म्हणून चांगले असले तरी रंगसंगतीतील भडकपणामुळे आणि रेखाटणातील बेडौलपणामुळे तितके चांगले वाटले नाही. पारंपारिक शैलीत 'मेलडी' आणि श्री. ठोसर यांचा 'मेघ मल्हार' दोन्ही वेगवान तशीच मांडणीत व रंगसंगतीत बरी वाटली. 'ग्राफिक' व 'मॉडर्न' विभाग अत्यंत सामान्य वाटला. सुवर्ण, रौप्य, ब्रॉन्झ पदक वा राज्यपालाचे बक्षिस एकाही कलाकृतीला दिले गेले नाही. ही त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट.

**एक स्तुत्य प्रयत्न**

याच प्रदर्शनाला जोडून ख्यातनाम सतारिये विलायत खां या संगीतकाराच्या घराण्यातील वंशावळीच्या अवशेषांचे एक छोटेसे प्रदर्शन भरविण्यात आलेले आहे ते मात्र प्रेक्षणीय आहे. ते बरेचसे अपूर्ण वाटते. तरीही त्या घराण्यातील दिग्गजांची रंगीत चित्रे, त्यानी मिळविलेली पदके, त्यांचे अंगरखे आणि ज्यावर त्यानी 'आसेतु हिमाचल' कीर्ति मिळविली ती त्यांची वाद्ये पाहाताना मन धुंद होते.

गेल्या दोन वर्षापासून बॉम्बे आर्ट सोसायटीने आपल्या वार्षिक प्रदर्शनात चित्र-शिल्प कलेतील एखाद्या थोर कलावंताचा गौरव करून त्या वर्षीचा थोर कलावंत म्हणून त्याला मानपत्र द्यायचा पायंडा पाडलेला होता. पहिल्या दोन वर्षात ख्यातनाम शिल्पकार श्री. करमरकर व जगप्रसिद्ध चित्रकार श्री. मोहन सामंत यांचा असा गौरव केलेला होता. या वर्षी हा मान कुणालाच दिला नाही याचे कारण सोसायटी जाहीर करील काय?











सौ. सुधा करमरकर आणि मास्टर दत्ताराम : शतानीकमधील एक हृदयस्पर्शी प्रसंग

# प्लॅटॉनिक लव्ह !

**साहित्यसंघासारख्या** जाणकार संस्थेने शतानीक हे नाटक रंगभूमीवर आणलंय्. तेव्हा ते चांगले असणारच ह्या भाबड्या श्रद्धेने नाटक पाहिले. शंभर माणसाना भारी (शतानिक) माणूस आम्ही पाहिला. आता प्रेम म्हणजे काही कुस्ती आहे का हो? तिथे एका फाटक्या अंगाच्या पण पोलादी मनाच्या माणसाची ताकद पुरते! शंभर माणसाना 'भारी'चा संबंध काय? शतानीक नावाच्या एका मोठ्या मनाच्या माणसाची ही आहे प्रेमकथा! तशी जुनीच. प्रेम सफल तरी होते किंवा असफल तरी! असफल होते ते पुष्कळदा नियतीच्या क्रीडेमुळे! इथेही ते तसेच होते. पण तो देशाचा सेवक असतो. त्यासाठी तो प्रेयसीचे प्रेम विसरायचे ठरवितो. पण तिला ते विसरता येत नाही. म्हणून तो देश त्याग करायचे ठरवितो. तेवढ्यात त्याच्या राज्याचा राजा मलयगुप्त येतो. 'शतानीक' मुद्दाम बलात्काराच्या प्रयत्नाचे नाटक करतो. त्यामुळे राजा त्याचा वध करतो. राणी निष्कलंक असल्याचे तो मानतो. आपल्या प्रेमाची शपथ घालून शतानीक प्रियनंदिनीला मरू देत नाही. स्वतः मात्र शांत मनाने मरतो. प्रेमभंग होऊनहि तो उदार मनाने वागतो. कथेत नवीन काही नाही. त्यात शंभर माणसाना भारी ठरण्यासारखेही काही नाही. अशा 'ताकदी'ची माणसे पुष्कळ सापडतील– अगदी दादर गिरगांवातसुद्धा!

मग नाटकात काय आहे? ह्या नाटकात 'राजकारण' आहे बरं का! इथेही राजकारण! होय! आता 'शतानीका'च्या प्रेम-कथेत 'राजकारण' कशाला? काही संबंध? पण आहे. कारण मूळ नाटकाची कथा लहान. विषयाबाबत टाळ्या मिळण्याचा जमाना मागे पडलेला म्हणून मग 'चालू' राजकारण त्यात आले झालं! शतानीकाच्या ह्या नाटकात चीन आहे, पाकिस्तान आहे. आमचे कृष्ण मेनन आहेत. त्यांचं 'जीप' प्रकरणसुद्धा आहे. आता 'जीप'चा आणि शतानीकाच्या प्रीतीचा संबंध काय ? हे सारे राजकारण म्हणजे 'टाळ्यां'चे राजकारण बरं का! काही खरं नाही बघा! तशीच इथे देशभक्ति, राजकारण, राष्ट्रसंरक्षण, नीति वगैरेवर अगदी अनावश्यक (पण चांगली) प्रवचने आहेत. त्यातले विचार पटले बुवा आपल्याला. पण ह्या चांगल्या विचारांचा व नाटकाच्या कथावस्तूचा सांधाच कुठे जुळत नाही.

हे नाटक पाहताना "**मत्स्यगंधा**" (आता एक अध्याय समाप्त झाला व सूत्रधार) आणि **सीमेवरून परत जा** (आचार्य ह्या भूमिकेचे त्यांतल्या चारणाशीं साम्य नाही वाटत?) ह्या नाटकांचे बहुत स्मरण झाले. काही प्रसंग हृद्य आहेत. पण ते परिणामकारक-पणे लिहिले गेलेले नाहीत. वरुण जीभ आणि बोटे कापून शता-निकाकडे पाठवितो. हा प्रसंग केवढा मोठा, नाट्यपूर्ण. पण प्रेक्ष-काना बरोबर नेत नाही. थरारून सोडत नाही. विराध गुप्ताचे स्वगतही असेच! हेमदत्ता ही ह्या नाटकात कशासाठी येते? तिचे नेमके स्थान काय? ती कथावस्तूला नेमके काय साह्य करते? प्रियनंदिनी 'एकाकी' पडेल (स्त्री म्हणून) म्हणून ही दुसरी स्त्री आली असेल काय? आचार्यांची प्रवचने उत्तम व पटण्याजोगती! पण त्यांचे स्थान? आदित्यमिहीराच्या भूमिके-बद्दलही असेच थोडेफार म्हणता येईल. शतानीक, प्रियनंदिनी, धनगुप्त, मलयगुप्त, वरुण ह्या व्यक्तिरेखा प्रमुख अशा. चित्रण वास्तव असे. 'पुष्कळ वेळा असा विचार मनात येऊन गेला की, येवढा शंभर माणसांना भारी असलेला माणूस स्वतःला एवढा लोळागोळा कां करून घेतो? मलयगुप्त त्याला कां विचारीत नाही? त्याला मित्र म्हणून कैफियत कां विचारीत नाही? 'कर नाही तर डर कशास' ह्या वृत्तीने निर्मळ मनाने तो सारे सांगत कां नाही? बलात्काराचा हीन आरोप स्वतःवर लादून घेण्याऐवजी हा धैर्यशाली पुरुष काही वेगळा वागला असता तर? त्याचे मोठेपण सांगण्यासाठी त्याचाच स्वतःचा 'उपयोग अधिक केला आहे तेही काहीसे खटकते. ह्या नाटकाची भाषा पुष्कळशी नाट्यप्रकृतीला साजेशी व भरदार आहे. तरीही काही ठिकाणी ती फार क्लिष्ट, काही शब्द तर फारच खटकतात! **पण्यवस्तु नगण्य**, हा अखेरचा बिंदूही राष्ट्राच्या उद्धारासाठी **आटेन, पंचमस्तंभी** (त्या काळात) क्रमप्राप्तच आहे, वगैरे. कम्यु-निझमवरचे प्रवचनही अप्रस्तुत वाटते. त्यावेळचे सारे संवादही अप्रस्तुत (चांगली असूनही) चर्चा वाटते. तिचा सांधा जुळत नाही.

नाटकाचा प्रयोग मात्र चांगला होतो. मा. दत्ताराम हे वस्तुतः पन्नाशीच्या पुढचे! पण 'शतानीक' पहाताना ते अधिक तरुण वाटतात. सौ. सुधाबाईंच्या कामाबद्दल वाद नाही. मलयगुप्त (कमलाकर सारंग) दिसतात चांगले. वागतात (रंगमंचावर) चांगले. शंकर घाणेकर (वरुण) 'विनोदी' वाटत नाहीत. (हे त्यांचे मोठे यश) नाटकाचा प्रयोग पाहताना दत्तारामांचा 'भीष्म'ही मला सारखा स्मरत होता. (अर्थातच भीष्माची ताकद फारच मोठी) प्रकाश मळकर्णेकरांची प्रकाशयोजना 'ए वन्'!

असे हे 'शतानीक'!! जुनी कथा पण नवा (पाकिस्तानी–चिनी) संघर्ष असलेले! देशभक्ति जागृत करणारे! 'प्लॅटॉनिक लव्ह'ची महती गाणारे! जरुर पहावे असे मात्र खचित!!

—बन्याबापू











अनुक्रमणिका

# 'अजून' अंकावर अभिनंदनाचा वर्षाव

## विशेषणे संपली, त्याचं काय ?

सादर नमस्कार वि. वि.

आपला अजून अंक दुपारी अडीच वाजता मिळाला. आत्ताच वाचून संपला. आता तक्रार करावयाची म्हणजे एकच. एकामागून एक इतके सुंदर खास अंक आपण काढत गेलात तर त्यांच्यासाठी आम्ही एकाहून एकचढ अशी विशेषणे कुठून काढावयाची ? रमणीयता नित्य नूतन असते हेच खरे.

अमुक एक साहित्य उणे अधिक आहे असे सुचवावयाचे नाही. पण व्यक्तिगत आवड या दृष्टीने मला सर्वांत अधिक आवडली ती श्री. ना. व्यं. देशपांडे यांची कथा. गेल्या तीस पस्तीस वर्षांत पंधरा-वीस कथा माझ्या मनात रुजून बसल्या आहेत. त्यातली ही एक झाली. पुंडलीकजी कातगडे व चार्ली चॅप्लीन ही व्यक्तिचित्रेही आवडली. चॅप्लिन मॉं सियें व्हर्डू-मधे जी काळजाला भिडणारी जीवन दृष्टी प्रकट करतो तिची पुनर्भेट क्षणभर खळबळ उडवून गेली.

श्री. वा. रा. कान्त यानी उर्वशीला उत्तम न्याय दिला आहे. त्यांच्या लेखात अर्थात केवळ उर्वशी आणि पुरूरवा यांच्या प्रीतीचेच उन्नयन होत आहे असे नव्हे तर कामभावनेचेच उन्नयन होत आहे. कामभावना ही आनंदकारण असते म्हणून माणसाला सर्जनशील बनविते आणि कलाना नवी स्फुरणे आणून त्यांची क्षितिजे विस्तारते अशा गोषवाऱ्याचे त्यातील विचार अतिशय उद्बोधक आहेत. कामः धर्मार्थयोः वरः या महाभारताच्या आधाराशिवाय हे विधान अधिक शोभून दिसते असे मला वाटते. कान्ताना कामभावनेत दिसणारे सौंदर्य महाभारतकारांना दिसलेच होते असे मानणे कठीण आहे.

आपले मुखपृष्ठ अजून आहे हे लिहावयास मी विसरणार नाही. हे सर्व आपणच करू शकता. बायकांच्या खांद्यावर बसून कुठेतरी पहाणारा चावट पोपट पाहून दुप्पट हसू आले. कारण हा पोपट पूर्वी मिर्च्या खाऊन काहीतरी करताना दिसला होता. पाचव्या पानावरील भ्रमणचित्रात एकादी वांगडी आणि एकदा निमुळत्या बैठकीचा उंच ग्लास दिसतो की काय ते मी पुष्कळ शोधले. कदाचित् या गोष्टी औचित्य विघातक ठरत्या.

आयुष्यात दीपावलीशी योग जुळला हा एक मोठा सुयोग. त्याने गेल्या चार पाच वर्षात आयुष्याची दिशाच बदलून गेली. असे मी म्हणतो ते आपणास रुचत नाही हे खरे. पण मला ते रोज आठवते त्याला मी तरी काय करू ? कळावे लोभ वाढावा ही वि.

आपला नम्र

**सांताक्रूझ** **आनंद साधले.**

## बी. रघुनाथ....

सप्रेम प्रणाम वि. वि.

आपला अजून विशेषांक आताच मिळाला. या 'अजूना'तील कविवर्य कांत, श्री. यशवंत कानिटकर व श्री. दा. गो. देशपांडे ही सारी माझी मित्रमंडळी आहेत. श्री. कानिटकरांनी कै. बी. रघुनाथ यांच्यावर लिहिलेला लेख खास वाचला. कै. बी. रघुनाथ यांच्याबद्दल मला शब्दातीत आदर व प्रेम आहे. त्यांचे चरित्र मी लिहावयास घेतले आहे. त्यांच्या प्रतिभेचे क्षेत्र कलेकलेने वाढत गेले, त्या काळात मी त्याना लिहिलेली सुमारे ८००–९०० पत्रे त्यांच्या संग्रही होती हे ते गेल्यावर मला कळाले. मी ती सारी मजपाशी आणविली आहेत. आंब्याचे बी लागलेले पहावे व त्याचा मधुर फळरस चाखावा असा अनुभव मी घेतला आहे. असो.

आपला

**काचीगुडा**
**हैद्राबाद** **र. मु. जोशी**

## कद्रदॉं (!)

**स. न. वि.वि.**

**'दीपावली'चा 'अजून' अंक बहारीचा रंगला आहे. दिवाळी अंकाइतकाच देखणा नि कोणत्याहि खास अंकापेक्षा खमंग, खुसखुशीत! या मैफलीतील कलावंतांची कदर केल्याबद्दल आपले अभिनंदन आणि आपल्यासारखा चोखंदळ 'कद्रदॉं' लाभल्याबद्दल 'अजून' मंडळींचे अभिनंदन! नाहीतर अशा गुणवंत गटाचा परिचय आम्हाला लाभता ना!**

**"क्योंकर न यह मेहफिल आये पसंत सबको ?**
**"यह रंग हीं नया है कूचा ही दुसरा है।"**

**असे अकबर इलाहाबादीच्या शब्दात किंचित् बदल करून म्हणावेसे वाटते. अधिक काय लिहू?**

**आपला,**

**कलकत्ता** **श्रीकृष्ण जोशी**




## पहा, जाहिरातीसुद्धा काव्यात्मक !

सादर प्रणाम,

'दीपावली' 'अजून' विशेषांकाचे पुष्टिपत्र करून हें पत्र लिहित आहे. श्री. ना. व्यं. देशपांडे यांची 'पहायची फक्त वाट' आणि–'पुंडलीक' वाचून आणि इतर अंक चाळून. 'पहायची फक्त वाट' बेहद्द आवडली अक्षरशः दोन शब्दात सांगायचे तर 'उत्तम आहे'. आता नंतर अर्थात् विवेचन वगैरे : दोन भले होठे खड्डे कथेच्या वाटेत आहेत. पैकी पहिला म्हणजे ज्या चमत्कृतिपूर्ण आणि चमत्कारिक वैद्यकीय तपशिलावर, ज्या शरीरशास्त्रीय Phenomenon वर कथेतील संघर्ष आधारलेला आहे तो तपशील आणि दुसरा म्हणजे पात्रांकरवी तुकड्या तुकड्यानी निवेदन करून 'ठशी' सारखी गोष्ट सांगण्याची शैली. खांडेकरानी किंवा तत्सम कोणा थोर साहित्यिकाने मला वाटते त्या शैलीत एक कादंबरीहि शिवली होती.






(ती उसवली अर्थात् लवकरच !)—पण सांगायची गोष्ट म्हणजे त्यानी या दोन्ही खाडचांना टाळून आपली कथा यशस्वीपणे Steer केली आहे. सगळी गोष्ट वाचून संपविल्यावर 'ति'च्या कानात ऐकू येणारे चमत्कारिक आवाज शिल्लकच राहातात.

Well, the story has 'arrived'! Congratulations!!

इतर अंकहि तसा चांगलाच आहे. य. दि. फडक्यांची कथा चांगली आहे. 'आय्. ॲम नॉट पुंडलीक' अंकातील सर्व व्यक्तिदर्शनात उजवे उतरले आहे. कांतांच्या काव्यनाट्यापेक्षा त्यांची 'उर्वशी' चांगली आहे. दा. गों. च्या 'गिलाव्या'चा शेवट 'जीवन्त' आहे. (चार्लस चॅप्लीन अर्थात्च उजवा. ) कवितांहून जाहिराती अधिक काव्यात्मक आहेत. (विशेषतः डेक्कन फ्लॉर मिल्स वगैरे) मी दलाल असतो तर भास्कर उत्तरवारांचा 'मोटीफ' छापण्याऐवजी तेवढा कागद स्वच्छ कोरा ठेवला असता. (कदाचित् मी दलाल नाही याच्या अनेक कारणांपैकीं माझे वरील मत हेहि एक कारण असू शकेल.)

आपला

औरंगाबाद रविंद्र सुर्वे

## 'अजून' कैफियत !

प्रिय दलाल,

आपण आमचा 'अजून' दीपावलीच्या ऑगस्ट अंकात प्रकट आणि आणि सादर केलात, त्यानिमित्ताने लिहीत आहोत—

अंक तर बाहेर पडला. त्याच्या टवटवीतपणाबद्दल कौतुक वा टीका रसिक आणि चोखंदळ वाचकांकडून समजेलच. परंतु अंकापेक्षा तो अंक निघण्यापूर्वीच्या काळातील लेखन, चर्चा, वाद-संवाद, यांची धुंदी अजून रेंगाळते आहे मनात ! रंगाने मोहवणारा, रसाने खुलवणारा पक्व आंबा कुणाला आवडणार नाही ? पण पाडाला आलेल्या आंब्याची चव काही न्यारीच ! नाही का ? तशीच काहीशी होती ही धुंदी ! असो. आता आमची थोडी कैफियत—

सर्वकडेच माणसे आपआपले काम चालू असताना आणि काम संपल्यानंतर जमतात व बोलतात. प्रत्येकजण व्यवसाय व संपर्क यांच्या संदर्भात सांगत असतो. ऐकवत असतो. आपल्यापासून दूर झालेला ऐकण्याची कुवत गमावत वसतो. जिव्हारी लागलेले दुःख जिभाळत असतो आणि विरंगुळा मिळाल्याचा भास अनुभवत असतो. हा शक्तिपात थांबत नसतो. सृजनांचा स्रोत बंद होतो. सृजनहीन जीवनात वैफल्याचा पसारा वाढतो आणि आत्मवंचना येते. साहित्यातही असे होते. ऐकणे-ऐकवणे यांची संगती व्यवहाराच्या पातळीपेक्षा उच्चस्तरीय बनत नाही. म्हणूनच मनाची उघडझाप नसते. मनाचे उघडणे होत नाही. उघडणे होत नाही मग उमलण्याची बात कशाला ? जीवन कुसुमित होत नाही. . .

परन्तु अशी काही जाण ठेवून वाण भरून काढण्याकरिता मोहीम काढली नाही. भान होतं ते केव्हा केव्हा ध्यान लागते याचे ! काही लिहिलं जातं. सुचत असतानाच प्रकट करावसं वाटतं. तसं करता नाही लिहिण्यास जोष येतो. गति वाढते. लिहिल्यानंतरही कुणाला तरी ऐकवावं व व ऐकावसं वाटतं. हे तुटू नये, चालू राहावं असं वाटतं. यातूनच एकमेकाला खुलवणारा संवाद येतो. भेटी संवादी बनत जातात. जीवनातल्या आणि साहित्यातील गाठी उकलत जातात, बसत जातात. तर कधी कधी अहंकारही डोकावून जातो. . .

हे असं सातत्यानं वर्ष दीडवर्ष करीत आलो. दिवसांचे भान राहिले नाही. रंगत चाललो होतो. आपापले वेगळेपण जपून ठेवूनही गोफ तयार होत होता. अधून मधून विचार यायचा. किती बोललो ? किती लिहिले ? काय कल्पिले ? काय वांच्छिले ? मधूनच असा विचार कवडसा बने. अंतर्मुख करी. अस्मिता पाजळी..... आणि एके दिवशी सूत्र पकडण्याचा मानस व्यक्तविला. साऱ्यांनी हुंकार भरला. कांतानी बारसे केले ! 'अजून' प्रकट झाला. सूत्र नावात नीट पकडल्यासारखं वाटलं. . .

अन् एके दिवशी तुमच्यापुढे सहज उल्लेख केला. प्रकाशन काढायचे म्हणालो आणि तुम्ही 'दीपावली'ची ओसरी रिकामी ठेवतो म्हणालात. अगा, दोन डोळे मिळाले ! या ओसरीवर परिचय नसलेल्यांची ओळख झाली. ओळख असलेल्यांची नीट खूण पटली.

दीपावलीने दोन दशके ओलांडली. ती वेगळीच कहाणी. त्या कहाणीत आम्हाला सामावून घेतले. शारदेच्या मंदीरातील रीत ओळखणारे आणि त्यातील शुचित्व व चारुत्व जपणारे तुम्ही. तुमचे— पण तुम्हाला स्तुति आवडत नाही आणि आम्हाला असे वाटते की खरी स्तुति करावयासही हिंमत लागते.

अंक तयार होत असताना आम्ही रंगलो. तुमची हौसही रंगली. यातच तर मजा आला. हा मजा आभार मानून विघडविणे योग्य होणार नाही असे आम्हाला वाटते.

आपले

मुंबई "अजून"

●●●



आमचे स्नेही व 'दीपावली'चे हितचिंतक, 'आशा प्रिंटरी'चे श्री. मालपेकर यांची कन्या आशा हिचा विवाह श्री. सुमंत नागेशकर यांजबरोबर नुकताच मोठ्या थाटाने पार पडला. वधु-वराना आशीर्वाद देण्यासाठी अनेक प्रतिष्ठित नागरिक, हितचिंतक उपस्थित होते. नवदांपत्याला 'दीपावली'च्या हार्दिक शुभेच्छा.

## उपवर मुलींसाठी डोस !

डॉ. श्रीकांतशी ठरत आलेलं लग्न मोडल्यामुळे रजनी हवालदील झाली होती. तिनं आपलं सारं दुःख आपल्या जिवलग मैत्रिणीकडे मोकळं केलं. ऐकता ऐकता न राहवून तिची मैत्रिण उद्‌गारली, 'म्हणजे म्हणतेस काय? त्यानं तुला दिलेल्या सर्व भेटी परत घेतल्या?'

'हूं. अग एवढंच काय पण तो बेचाळीस वेळा घरी माझ्या भेटीला आला होता म्हणतो. तर त्याचीहि व्हिजीट फी लावून बील पाठवलय् त्यानं.'

## चिनी उलटी खोपडी

एका आंतरराष्ट्रीय क्रीडामहोत्सवाच्या १००० मैल धावण्याच्या शर्यतींच्या फायनल्सची ही गोष्ट. फायनलला दोघेच आले होते–एक भारतीय व एक चिनी उमेदवार. भारतीय उमेदवाराने ही शर्यत जिंकली, त्यानंतर चिनी वृत्तपत्रातून आलेले वृत्तः

'१००० मैल धावण्याच्या खडतर स्पर्धेत चीनचे यश. टिंग-टँग यांना दुसऱ्या क्रमांकाचा बहुमान' वगैरे. शेवटची ओळ होती–भारताचा नंबर शेवटून दुसरा होता !

## ते कठीण आहे, कारण....

"तिने तुला नकार दिला म्हणून तू इतका नाराज होऊ नकोस! कांही दिवसात तू तिला विसरून जाऊन परत सुखी होऊ शकशील!"

"ते कठीण आहे! कारण तिला दिलेल्या सर्व देणग्या मी हप्तेबंदीनं आणल्या आहेत. ते हप्ते फिटायला निदान चार वर्षं तरी लागतील!"

## अचूक वेळेचे कारण

एका मोठ्या शहरात रहाणारा एक माणूस रोज सकाळी टेलिफोन–ऑपरेटरला फोन करून 'किती वाजले' म्हणून विचारीत असे. पुष्कळ दिवस असा क्रम चालल्यानंतर एक दिवशी टेलिफोन ऑपरेटरनें अगदी न राहवून त्या माणसाला विचारले, "काय हो, रोज अगदीं ह्या ठराविक वेळी हा काय तुमचा ठराविक प्रश्न असतो?"

"मला वेळेबद्दल फार सावध रहावं लागतं." तो माणूस उत्तरला, "कारण रोज दुपारी बरोबर एक वाजता कारखान्याला सुट्टी झाल्याचा भोंगा मीच वाजवीत असतो!"

"छान!" टेलिफोन ऑपरेटर उत्तरली, "कारण रोज दुपारी कारखान्याचा भोंगा ऐकूनच आम्ही इथलं घड्याळ लावतो."

## प्रश्न कळला–प्रॉब्लेम नाही !

एक इंग्लिश, एक अमेरिकन व एक फ्रेंच अशा तीन तरुणींना एक प्रश्न विचारण्यात आला, "समजा पॅसिफिक महासागरातील एका बेटावर तुम्हीं एकट्या दहा खलाशांच्या तावडीत सांपडलात, तर काय कराल?"




चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

आंग्लयुवतीने उत्तर दिले, "मला बाई फीट येईल." अमेरिकन म्हणाली, "मी त्या खलाशांच्या तांडेलाकडून संरक्षण घेईन." आणि फ्रेंच तरुणी उत्तरली "प्रश्न कळला, परंतु त्यातला प्रॉब्लेम कांही समजला नाही बाई मला!"

## योग्य सल्ला

एक तरुण एका मुत्सद्याकडे गेला व म्हणाला, "एका श्रीमंत स्त्रीशी माझी ओळख झाली आहे. पण माझं तिच्यावर प्रेम नाही. मी पैशाकरिता तिच्याशी लग्न करावं काय?"

"पैशासाठी लग्न कर, असा सल्ला मी कधीच देणार नाही." तो मुत्सद्दी म्हणाला, "लग्न न करताच तू तिचे पैसे मिळविण्याचा प्रयत्न कर."

## कुत्र्याची काळजी

फाटकाच्या बाहेर उभ्या असलेल्या सतीशने आत उभ्या असलेल्या तात्यासाहेबाना म्हटले, "आत येऊ का? तुमचा कुत्रा चावत तर नाही ना?"

"कुत्रा चावत नाही. पण आपण बाहेरच उभे राहा. कारण कुत्र्यानं कांही वाईट–साईट खाऊ नये, म्हणून आम्हाला फार जपावं लागतं!" तात्यासाहेब उत्तरले.

## डोंगर पोखरून ( चमचा )

विषप्रयोगाबद्दलचा एक खटला चालू होता. वकिलान साक्षीदाराला विचारले, "आरोपीनं नथूशेठच्या कपात चहा ओतला तेव्हा त्यात कांही होतं का?"

साक्षीदारः—हो.
वकीलः—त्याचा रंग कसा होता?
साक्षीदारः—पांढरा!
वकीलः——ते काय होतं हें तुला सांगतां येईल का?
साक्षीदारः——अलबत्!
वकीलः——सांगा पाहूं?
साक्षीदारः——चमचा!

–श. शि. पंढारकर






( पृष्ठ ७ वरून-न्यायालयासमोर नाटककार )

"रणदुंदुभी" लिहिणारे कै. वीर वामनराव जोशी, आणि "सन्यस्त खड्ग" लिहिणारे कै. स्वातंत्र्यवीर सावरकर या नाटककारांची उदाहरणे सोडली तरी कै. खाडिलकरांच्या "कीचकवध" "भाऊबंदकी" वा "सवाई माधवरावांचा मृत्यू" या गुणवान नाटकांचा वारसा पारतंत्र्यकालातहि मराठी रंगभूमीला मिळाला होताच ना ? नवनाट्याचे गोडवे गाणाऱ्या नाटककारानीहि जियाँ पॉल सार्ग या नाटककाराचे "दी लुसेस् वीन्स" हे प्रयोगशील नाटक जरुर वाचावे. युद्धोत्तर काळातली जर्मनीसारख्या राष्ट्राला आलेली अवकळा या समर्थ साम्यवादी लेखकाने ज्या भेदकतेने आणि सहानुभूतीने हाताळली आहे ती पाहून मन स्तिमित होते. आणि असा प्रश्न मनात येतो की, चिनी पाकिस्तानी आक्रमणाने सबंध भारत आसेतू-हिमाचल ढवळला गेला, लक्षावधी तरुणांनी रक्ताच्या सहीने आपले निर्धार भारताच्या पंतप्रधानाना कळवले आणि शत्रूहि स्तिमित व्हावा अशी भावनात्मक एकता सबंध भारत वर्षात सळसळली. पण मराठी नाटककारांच्या भावनेवर एक तरंग उठण्याइतपत देखील ही घडामोड बलशाली ठरली नाही काय?

का ही युद्धे दूरच्या प्रदेशात लढली गेली म्हणून दिवसा महागाई आणि रात्री काळोख, याशिवाय मराठी नाटककाराना अन्य कोणती झळ पोचलीच नाही? एका सीमेवरून जातीयवादाचे नि दुसऱ्या सीमेवरून साम्यवादाचे राहु केतू भारताच्या स्वातंत्र्यसूर्याला गिळायला धावलेले पाहून या लेखकांची मने बेचैन कशी झाली नाहीत ? इतिहास आणि पुराणे मराठी नाटककारांना प्रेरणा देण्यास असमर्थ ठरली काय? मराठी नाटककारांची कल्पना शक्तीच थिटी झाली आहे की त्यांची विचारशीलता आणि संवेदनक्षमता बोथट झाली आहे?

रोजचे वर्तमानपत्र उघडून वाचले तरी अनेक प्रभावी नाटकाचे विषय हाती गवसावेत अशी वस्तुस्थिती असताना प्रयोगशील नवनाटककारांची प्रतिभा पांढरपेशांच्या चिमुकल्या सुखदुःखाचा कापूस कां पिंजत बसली आहे? तेजपूरला जो घबराट उडाला आणि फूट हिल्सपाशी चिनी सैनिक आलेले ऐकून सर्व लहानथोर अधिकारी आणि श्रीमान लक्ष्मीचंद मंडळी अश्राप प्रजेला सोडून जीव घेऊन जी पळत सुटली, तो काय नाटकाचा विषय होऊ शकत नाही ? कालपरवापर्यंत अहिंसेचे स्तोत्र गाणारी माणसे युद्धाचा पहिला दणका बसताच एका रात्रीत हृदयपरिवर्तन होऊन लगबगीने सैन्यभरतीचा उपदेश करू लागतात, यात एक महान शोकांतिकेचे वा प्रहसनाचे नाट्यबीज कोणाहि नाटककाराला सापडू शकत नाही? युद्ध झाले की सैनिकांच्या गळयात हारतुरे घालावेत पण एरवीच्या सामाजिक जीवनात सैनिकाला संसारासाठी बायकोहि मिळू नये वा घरंदाज मातापित्यानी मुलाला सैन्यामध्ये घालण्याचा विचार नाक मुरडून करावा—यातून एखाद्या जिवंत प्रमेयप्रधान नाटकाची उभारणी होऊं शकत नाही? अब्दुल हमीदचा भीमपराक्रम, स्क्वॅड्रन लीडर कीलरची हवाई धडक वा शेकडो जवानांनी पॅटन टॅंक्सची केलेली ससेहोलपट यातून जीवदर्शी नाट्याची उभारणी होऊ शकणार नाही? स्वातंत्र्यरक्षणाची लढाई केवळ आघाडीवरच लढली जाते असे नाही. जीवाची शर्थ करून शूर सैनिक प्रत्यक्ष युद्धाची आघाडी सांभाळतात तेव्हा मागे सामान्य नागरिक, सामाजिक जीवनात कोणकोणती व्रते पाळतात यालाहि अनन्यसाधारण महत्त्व आहे. युद्धसन्मुख जवानाना तर "हम तो एक गोली का मालिक है" या सूत्राचे बाळकडू बालपणापासून शांततेच्या काळातदेखील पाजले जाते. पण आमचे शिक्षक, डॉक्टर्स, एंजिनिअर्स, व्यापारी, सरकारी अधिकारी आणि राजकीय पुढारी प्रत्यही समाजजीवनात कोणत्या अमृत तत्त्वांचे सिंचन घडवीत आहेत? आघाडीवर बलिदान करणाऱ्या असंख्य जवानांच्या आत्म्यानी नाटककारांच्या मानगुटीवर बसून "आम्ही कोणासाठी रक्त सांडले"? कशाचे रक्षण करण्यासाठीं आम्ही बलिदान केले? हा सवाल विचारला तर त्या सवालातून विचारप्रक्षोभक नाट्यनिर्मिती होऊ शकणार नाही? समाजजीवनातील भ्रष्टाचार, कार्यक्षमता आणि ढिलाई, पांढरपेशांची पोटार्थी वृत्ति, व्यापाऱ्यांचा काळाबाजार, शेतकरी कामकरी वर्गांचे प्रचंड अज्ञान, राजकीय पुढाऱ्यांची सत्तास्पर्धा आणि विचारवंताचा ढोंगीपणा, यासारख्या ठळक ठळक प्रवृत्तींचे पुसट दर्शन तरी युद्धसन्मुख समाजातल्या नाटककारांच्या नाट्यकृतीतून व्हायला नको का?

हे माझे विचार म्हणजे एक प्रकारचे प्रगट आत्मचिंतन किंवा नाटकाच्या परिभाषेत सांगायचे तर एक "स्वगत आहे". आजकालच्या कोणाहि श्रेष्ठ नाटककारावर वा कोणाच्या नाट्यसेवेचा अधिक्षेप करण्याचा माझा तिळमात्रहि हेतु नाही. म्हणूनच अल्प स्वल्प नाट्यरचना करणाऱ्या मलाहि मी या चिंतनाच्या धारेतून वगळलेले नाही. अखेर कार्लाईल म्हणतो ते खरेच आहे की, "व्हेअर देअर इज नो विझिन्, दी नेशन् पेरीशेस्" भव्य स्वप्ने पाहण्याची समाजाची कुवत संपली की समाज अस्तंगत होतो. नाटककार हे जर समाजाचे नेत्र असतील तर ही भव्योदात्त स्वप्ने त्यानीच प्रथम पाहिली पाहिजेत आणि जनतेला दाखवली पाहिजेत. ही भव्योदात्त स्वप्ने पाहणाऱ्या नाट्यमहर्षीसाठी रसिकानीच नव्हे तर टीकाकारांचा टीकाकार जो काळ त्यानेहि सदैव मानाचा मुजरा राखून ठेवला आहे.

●●●

# तुमचे मत कुणाला ?

जगाच्या पटावरून राजे-राण्या आता झपाट्याने बाद होत आहेत. हुकुमाची राणी काय न् राजा काय, आता उरलेत फक्त खेळात ! कारण आजचे सर्वसत्ताधिकारी तुम्ही स्वतःच आहात. इतिहास घडवणारे तुम्हीच, राजसिंहासनावर कुणी बसावं हेहि ठरवणारे तुम्हीच नि कुणाला पदच्युत करावं हाहि सर्वाधिकार तुमचाच. फार पूर्वीहि अशी सत्ता तुमच्या हाती होती. 'वाजपेय यज्ञ' करून तुम्हीच तुमचा नेता निवडीत होतात.

या दिवाळीत निवडणुकींची रणधुमाळी सुरू होईल. निवडणुकीची धमाल आणि दिवाळी अंकांचीहि कमाल होईल. पण सर्व भवितव्य हातात आहे केवळ तुमच्याच ! तुम्ही तुमच्या अमोल मताने ज्याप्रमाणे खंबीर, त्यागी, निस्पृह नेता निवडणार, त्याचप्रमाणे सर्वोत्तम आणि अभिरुचिसंपन्न दिवाळी अंकाची निवडहि तुमच्याशिवाय कोण करू शकतो ?

सार्वत्रिक निवडणुकीतलं तुमचं मत कदाचित् ठरलं नसलं तरी दिवाळी अंकांतील अजिंक्यपदाच्या निवडणुकीचा निकाल लागलेलाच आहे, हे गुपित नाही —

याहि वर्षी 'दीपावली' च ! गेली एकवीस वर्षं दिवाळीच्या आनंदात भर घालून तुमच्या मतास पात्र ठरलेले अजोड वार्षिक !

या वर्षीहि तुमचं अमोल मत 'दीपावली'लाच ! !

## दीपावली

**वार्षिक : दिवाळी अंक '६६**

टे. नं. ३५७७६५

ग्रॅम DALALART

अधिक माहितीसाठी :

**दलाल आर्ट स्टुडिओ**

प्रकाशक : 'दीपावली' मासिक

४२, केनेडी ब्रिज, मुंबई - ४.

अनुक्रमणिका





EGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment SEPTEMBER 1966



COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY-4.